टिकलें आहे ? धर्मापेक्षां राज्य मोठें नाहीं. लोक तुला काय म्हणतील याचा विचार कर." संजयाच्या या विशिष्ट प्रचाराचा परिणाम अर्जुनावरसुद्धां किती झाला होता हें गीतेच्या पहिल्या अध्यायावरून दिसून येईल. मग युधिष्ठिर तर कोमल मनोवृत्तीचा अर्कच होते. पण श्रीकृष्णांनीं युधिष्ठिरासमोरच त्यांना पटेल अशा पद्धतीनें धार्मिक परिभाषेंतच संजयावर अशी बाजू उलटविली कीं त्यानंतर धृतराष्ट्राला पुन्हां धर्मपरिभाषेंत आश्रय शोधण्याचें सामर्थ्यच उरलें नाहीं. सजयाला उत्तर देतांना (उद्योगपर्व अ.२९) प्रथमच श्रीकृष्णांनी युधिष्ठिराला धर्माचा उपदेश करणाऱ्या संजयाच्या शिष्टपणावर म्हणजे पर्यायानें राजा धृतराष्ट्राच्याच धृष्टतेवर जोरकस प्रहार केला. ते म्हणाले कीं, "हे संजया, मोठा धर्माचा उपदेश करावयास तू आलास. पण माझ्यापेक्षां व धर्म-राजापेक्षां तुला धर्म अधिक कळतो काय ? उत्साहानें आपला स्वधर्म पाळावयास निघालेल्या युधिष्ठिरालाच धर्माचा उपदेश करावयास धजणें हें केवढें धारिष्टच आहे ! तुला जर सर्व धर्म कळतो तर चातुर्वर्ण्याचाही धर्म तुला कळत असलाच पाहिजे. मग मी तुला असें विचारतों कीं ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचे धर्म जर तुला कळतात तर कौरवांच्या कडून अज्ञानीपणानें धर्मानुसार वागणाऱ्या आम्हांला तो धर्म टाकून देण्याचा उपदेश करावयास तूं आलासच कसा ? क्षत्रियांचा वेदोदित धर्म, अश्वमेध राजसूयादि यज्ञ करणें हा असून धनुष्य, चिलखत, रथ, चतुरंग सैन्य, व शस्त्रें हीच तो धर्म पाळण्याचीं खरीं साधनें आहेत. त्या आपल्या धर्मानुसार आपल्या पूर्वजांच्या दिव्य परंपरेला अनुसरून युद्धाचें आपलें धार्मिक कर्तव्य पार पाडीत असतांना पांडवांना मरण आलें तरी सुद्धां तें धर्मदृष्ट्या प्रशंसनीयच समजलें जाईल. पण कायरे ? राजांच्या धर्माची तुला ओळख आहे म्हणतोस ! मला सांग युद्ध हा राजाचा धर्म आहे, कां युद्धाला पाठ दाखविणें हा धर्म आहे ? चातुर्वर्ण्याच्या धर्मकर्मानुसार युद्धरूपी धर्माचें आचरण करणाऱ्या पांडवांची तूं प्रशंसा कर किंवा हवें तर निंदा कर, पण ते कोणाच्या प्रशंसेनें वा कोणाच्या निंदेनें आपला धर्ममार्ग मुळींच सोडणार नाहींत हें लक्षांत ठेव. राजांचा

धर्म अप्रमत्त राहून प्रजेचें संरक्षण करणें, दान देणें, यज्ञ करणें व विवाह करून गृहस्थाश्रमधर्माचें उत्तमपणें पालन करणें हाच आहे. या आपल्या धर्मानुसार वागणारा, सर्व वर्णांना त्यांच्या त्यांच्या धर्मानुसार वागावयास भाग पाडणारा, अंतःकरणांत निर्लोभ वृत्ति धारण करून प्रजांच्या विषयीं समभावना अंतःकरणांत बाळगणारा राजा श्रेष्ठ म्हणविला जातो. त्यानें लोभ धारण करूं नये परंतु कर्तव्यही सोडू नये. केवळ बळ हाच नीतीचा दंडक समजून अपहरण करण्याची बुद्धि राजे लोकांत उत्पन्न झाली त्या वेळीं युद्धें उत्पन्न झालीं व त्याची साधनें म्हणूनच चिलखत, शस्त्र व धनुष्य यांची उत्पत्ति झाली. महेंद्रानें मानवतेंतील कंटकांचा (दस्यु) वध करण्यास्तव शस्त्र, चिलखत व धनुष्य यांची निर्मिति केली. दस्यूंच्या वधानें अतिशय मोठ्या पुण्याचा लाभ होतो व ज्यांना दस्यू म्हणावें असे सर्व दोष कौरवांच्या ठिकाणीं उत्कटतेनें वास करतात. अधार्मिक व धर्ममर्यादा न ओळखणाऱ्या दस्यूच्या व कौरवांच्या मध्यें कांहींएक भेद नाहीं. आपल्या पुत्रासहित राजा धृतराष्ट्र धर्मानेंच जें पांडवांचें आहे तें गिळंकृत करून वर तें त्यांना पुन्हां कधींही परत न देतां सदाचें पचवून टाकण्याचीं कारस्थानें करीत आहे. प्राचीन राजधर्माची त्याला पुसटशी सुद्धां ओळख नाही. सारे कौरव त्याच्या या पापकृत्यांत त्याचे साथीदार आहेत. तू म्हणशील कीं दुर्योधन दोषी आहे. धृतराष्ट्राचा दोष काय ? पण लोकांना न दिसतां चोरी करणारा व उघडपणें चोरी करणारा हे. दोघेही सारखेच तिरस्करणीय आहेत. धृतराष्ट्र हा स्वतः आड राहून अपहरण करणारा आहे, तर दुर्योधन हा उघड अपहार करणारा आहे. दोघेही सारखेच पापी आहेत. त्यांच्यांत कांहीं भेद नाहीं. अंतःकरणांत लोभ वाढलेला, व तो झांकण्यासाठीं धर्माची ढाल पुढें उभी करणारा राजा धृतराष्ट्र आतां वांचू शकणार नाहीं. जें पांडवांचेंच ठरलेलें आहे, त्याचा अधर्मानें अपहार करून, वर धर्माच्या गोष्टी तुम्ही कितीही सांगितल्या तरी त्या कोण ऐकून घेईल ? कौरवांच्या राज्यामध्यें परत जाऊन तूं त्यांनाच धर्माचा उपदेश कर. त्यांना जाऊन सांग की, चालत आलेल्या परमपवित्र

पुरातन धर्मानुसार पांडव आपला राज्यभाग घेण्याप्रीत्यर्थ स्वतःचे प्राणसुद्धां रणदेवतेस समर्पण करतील, पण कोणत्याही परिस्थितींत चोरांना आपले अधिकार पचूं देणार नाहींत. ते सगळे मृत्युपाशांत सांपडलेले आहेत. असेंच भयानक पाप त्यांच्या हातून घडलेलें आहे कीं, त्यांना क्षमा असूं शकत नाहीं. मृत्यूशिवाय त्यांना आतां दुसरा कोणताही दंड नाहीं. पांडवांची प्रिय भार्या, महासती यशस्विनी द्रौपदी, रजस्वला अवस्थेंत भरसभेंत ओढीत आणण्यांत आली असतां तुमच्यांतील भीष्मप्रभृति लोकांनीं त्या गोष्टीची उपेक्षा केलेली आहे हें मी विसरूं शकत नाहीं. कौरवांमधील लहानापासून थोरापर्यंत सर्व लोक या अपकृत्यांत भागीदार आहेत. कोणी जर त्या वेळीं, निदान स्वतः धृतराष्ट्र तरी हें अपकृत्य थांबवावयास पुढें आला असता तरी त्यानें माझें मोठें प्रिय केलें असतें व त्याच्या पुत्रांनाही मृत्युदंडापासून वांचवितां आलें असतें. सासऱ्यांच्या व वडीलधाऱ्या मंडळींच्या सभेंत त्या कुलांगार दुःशासनानें द्रौपदीला फरफरत ओढीत नेलें. ती करुण विलाप करून कोणी आपल्याला संरक्षण देईल काय म्हणून पाहूं लागली असतां एकटचा विदुरावांचून दुसरे कोणीही तिला आधार देऊं शकलें नाहीं. केवळ कार्पण्यामुळें कुरुसभेंतील मोठमोठ्या सामंतांपैकीं प्रत्येकजण गप्प बसला. एकालाही त्या सभेंत बोलण्याचें धैर्य झालें नाहीं. धर्माचा सन्मान राखून केवळ एकटचा विदुरानेंच त्या मूर्खाला सन्मार्गाचा उपदेश केला. संजया, तूं सुद्धां या पापांत साथीदार आहेस. कौरवसभेमध्यें हा अधार्मिक प्रकार चालू असतां तेथें तूं कौरवांविरुद्ध व धर्माच्या सन्मानाप्रीत्यर्थ एक शब्द तरी बोललास काय? त्या वेळीं तुला धर्माची आठवण कोठें आली नाहीं? आणि आज युधिष्ठिरासारख्या धर्ममूर्तीला तूं धर्माचा उपदेश करावयास आलास काय? हें साहस करावयास धजतांना तुला लाज कशी वाटली नाहीं? द्रौपदी खरोखरीच धन्य आहे. अथांग सागरांतून नावेनें स्वतः तरून इतरांसही तारावें त्याप्रमाणें तिनें दुःखसमुद्रांतून स्वतः तरून पांडवांनाही तारलें आहे. त्या वेळीं तिच्या श्वशुरासमक्ष, तो अधम सूतपुत्र कर्ण, त्या महासतीला

काय बोलला तें तुला आठवत नसलें तरी तें माझ्या हृदयावर चांगलेंच कोरलेलें आहे. "हे द्रौपदी, तूं दुर्योधनाची दासी होऊन राहा. तुला आतां दुसरा मार्ग नाहीं. तुझे पति दुसऱ्याचे गुलाम झालेले आहेत. ते आतां पति राहिलेले नाहींत. त्यांचा तुझ्यावर कांहींही अधिकार नाहीं. तू दुसरा पति निवड." संजया, कर्णाचा हा मर्माचा आघात म्हणजे हाडांत खोलवर रुतून बसलेला बाण आहे. अर्जुनाच्या अंतःकरणांत हा बाण एकसारखा सलतो आहे. पार्थ त्याच्या वेदना विसरूं शकत नाहीं. कृष्णाजिनें नेसून पांडव वनांत जावयास निघाले असतां हे षंढ पार नष्ट झाले व दुर्गतीच्या नरकांत सदाचे गेले असें तो नीच दुःशासन म्हणाला. तो दुसराही बाण आमच्या हृदयांत खोलवर रुतून बसला आहे. गांधारांचा तो अधम राजा शकुनि द्यूताच्या वेळीं युधिष्ठिरांना म्हणाला, "काय उरलें आहे तुझ्याजवळ? आतां द्रौपदीला पणाला लाव." संजया, तो तिसराही बाण आमच्या हृदयांत खोलवर रुतून बसला आहे. असल्या वध्य, पापिष्टतम लोकांचें अन्न खाऊन तूं आम्हांला धर्मोपदेश करावयास आलास काय ? पण एक लक्षांत ठेव, शहाण्या माणसानें वन व व्याघ्र दोघांचेंही रक्षण करावें. सपुत्रराजा धृतराष्ट्र हें वन आहे, पांडव हे व्याघ्र आहेत. वनावांचून वाघ उघडा पडतो व त्याचा नाश होतो. वनांत वाघ नसला तर कोणीही तें वन तोडू शकतो. म्हणून वनानें व्याघ्राचें संरक्षण करावें व व्याघ्रानें वनाचें संरक्षण करावें हाच उत्कृष्ट मार्ग आहे. पांडव धृतराष्ट्राची सेवा करावयासही सिद्ध आहेत व त्यांच्याशीं युद्ध करावयासही सिद्ध आहेत. राजा धृतराष्ट्राला यापैकीं जें पत्करावयाचें असेल तें त्यानें खुशाल पत्करावें. तू जाऊन त्याला असें सांग कीं, धर्मनिष्ठ पांडव जसे शांततेचे पुरस्कर्ते आहेत, तसेंच ते समर्थ आणि अद्वितीय योद्धेही आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवून पुढचें पाऊल टाका."

भगवान् श्रीकृष्ण जर नसते तर संजयाच्या शिष्टाईच्या जाळ्यांत युधिष्ठिराचें काय झालें असतें तें सांगवत नाहीं. पण श्रीकृष्णांच्या संजयाला व त्याच्या मागोमाग धृतराष्ट्रालाही गार करून टाकणाऱ्या या धर्मपरिभाषेंतीलच जोरकस चपराकीनें धृतराष्ट्राचें तोंड

जें एकदां मिटलें तें सदाचें मिटलें आहे. फार कशाला, यानंतर पुन्हां चुकून सुद्धां धृतराष्ट्रानें धर्मपरिभाषेचा आश्रय घेतला नाहीं. यानंतरच्या प्रत्येक भाषणांत त्यानें आपला पक्ष व आपला मुलगा अधार्मिक आहे अशीच परिभाषा वापरलेली आहे. इतकेंच नव्हे तर पांडवांना उपदेश करण्याची कल्पना सुद्धां पुन्हा त्याच्या मनांत उद्‌भूत होऊं शकली नाहीं.

भगवान् श्रीकृष्णांच्या या अपूर्व बुद्धिकौशल्यानें पांडवांच्या भोवतीं संरक्षककवच उभारलें नसतें तर स्वतः पांडवसुद्धां वांचले नसते. इतकेंच नव्हे तर स्वतःच स्वतःभोंवतीं उत्पन्न केलेल्या खोड्यांतून सुटका न होतां ते विनाश पावले असते अशी वस्तुस्थिति आहे. कर्णपर्वांत या संबंधाची मोठी अद्‌भुत गोष्ट आहे. तिचा उल्लेख महाभारतावरील व्याख्यानें या ग्रंथांतील माझ्या अर्जुनावरील व्याख्यानांत मी थोडक्यांत केलेलाही आहे. महायुद्धांत कर्णानें युधिष्ठिराचा पराभव केल्यानंतर ते शिबिरांत आले. ते रणक्षेत्रांत दिसेनात म्हणून अर्जुन व श्रीकृष्ण हेही त्यांचा शोध करीत करीत शिबिरांत आले. त्यांना पहातांच कर्णानें केलेली आपली दुर्दशा कळून अर्जुनानें त्याला ठार मारलें असावें व ती आनंदाची वार्ता सांगावया-साठीं हा या ठिकाणी आला असावा अशा समजुतीनें युधिष्ठिरांनीं त्याची प्रशंसा करावयास प्रारंभ केला. तेव्हां अर्जुनानें त्यांना खरी परिस्थिति समजावून सांगितली. 'अजून मी कर्णाला मारलें नसून आतां जाऊन मारणार आहे' असें त्यानें सांगितलें. पण या वाक्यानें युधिष्ठिरांच्या आत्यंतिक आनंदाच्या भावना आत्यंतिक रागांत परिणत झाल्या व त्यांनीं क्रोधाच्या भरांत अर्जुनाला असें म्हटलें कीं, (कर्णपर्व अ. ६८–२८) "तुझ्यापेक्षां अस्त्र चालविण्यांत जो अधिक कुशल असेल त्याला हें गांडीव धनुष्य देऊन टाक." अर्जुनानें हें ऐकतांच एकदम खड्ग उपसलें व रागानें लाल नेत्र करून तो युधि-ष्ठिराकडे पाहूं लागला. श्रीकृष्णांनीं त्याची ती अवस्था पाहिली व त्याला विचारलें (कर्णपर्व अ. ६९–६, ७) कीं,

" अर्जुना, या शिबिरांत तुला वध्य आहे असें कोणीही दिसत नाहीं; मग कशासाठीं व कोणावर तूं प्रहार करणार आहेस ?

तुला वेड तर लागलें नाहीं? हें भयानक खड्ग तू कशासाठी हातांत घेतलें आहेस ?" अर्जुनानें त्यांना असें सांगितलें कीं, "दुसऱ्याला गांडीव दे असें जो कोणी मला म्हणेल त्याचा शिरच्छेद करावयाचा अशी माझी प्रतिज्ञा आहे. युधिष्ठिरानें तसें म्हटलें असल्यामुळें त्याचा वध केल्याविना मी सत्यप्रतिज्ञ राहणार नाहीं." भगवान् श्रीकृष्णांनीं तें ऐकतांच त्याचा धिक्कार केला (कर्णपर्व अ. ६९) व म्हणाले: "मला आज ही गोष्ट स्पष्टपणें कळली कीं परिणतप्रज्ञ लोकांचा तुला मुळींच सहवास घडलेला नाहीं. तू नुसताच धर्म-भीरु नसून महामूर्ख आहेस. महत्त्वाच्या प्रसंगी तुझी बुद्धि पूर्ण-पणें गोंधळली. धर्माचें खरें रहस्य जाणणारा मनुष्य तुझ्यासारखा कधींही वागणार नाहीं. एक तर अशी भलती प्रतिज्ञा तूं केलीस हाच तुझा मूर्खपणा आहे. शिवाय अशा पद्धतीनें ती पाळण्यांत अधर्म व मूर्खपणा यांचा तूं कळसच करीत आहेस. गुरूंना कसें मारावें याची तुला कल्पना तरी आहे काय ? ज्यांना तुम्ही म्हणा-वयाचें त्यांना तू म्हणणें व ज्यांचा सन्मान करावयाचा त्यांची तोंडावर निर्भर्त्सना करणें हाच गुरूचा खरा वध होय." अर्जुनानें श्रीकृष्णांच्या मार्गदर्शनानुरूप युधिष्ठिरांची निर्भर्त्सना केली व आपल्या प्रतिज्ञेचें पालन केलें. पण पुन्हां तो आपलें खड्ग उपसून उभाच राहिला. श्रीकृष्णांनीं विचारलें,"तुला वेड तर लागले नाहीं?" त्यावर पार्थ म्हणाला, "युधिष्ठिरांचा जो वध करील त्याचा वध करण्याची माझी दुसरी प्रतिज्ञा आहे. मी पर्यायानें कां होईना पण युधिष्ठिरांचा वध केलेला आहे. त्यामुळें स्वतःचा वध करणें हाच माझ्यासमोर मार्ग उरलेला आहे." भगवान् श्रीकृष्णांना स्वतःच्याचभोंवतीं आत्मनाशाचें कडें अकारण उभारून ठेवणाऱ्या आपल्या मित्राची दया आली. ते म्हणाले, 'वेड्या, अरे जसा युधिष्ठिराचा वध झाला, तसा तूं आपलाही वध करून घे. या तुझ्या पांचभौतिक शरीराकडून पुष्कळच मोठें कार्य सृष्टिदेवतेला करून घ्यावयाचें आहे. त्याचा नाश कशास्तव करतोस ? मी तुला मार्ग सांगतों. "तूं आपल्या तोंडानें आपली स्वतःची प्रशंसा

कर म्हणजे तुझाही वध झाला. स्वतःच्या गुणांची स्वतःच्या तोंडानें प्रशंसा करणें हाच मनुष्याचा खरा वध होय." खरोखरी भगवान् श्रीकृष्णांच्या बुद्धिमत्तेचें कवच होतें म्हणूनच पांडव वांचले आहेत. साऱ्या महाभारताच्या इतिहासांत एकाही प्रसंगाची अशी तटबंदी नाहीं कीं जेथें भगवान् श्रीकृष्णांची तीक्ष्ण व मार्गदर्शक बुद्धि अणुमात्र तरी अडखळलेली आहे.

भगवान् श्रीकृष्णांच्या कार्यकुशलतेंत एक विशेष गोष्ट अशी दिसून येते कीं, एका साध्या कामांत ते अनेक कामें साधून घेतात. कर्तृत्ववान् पुरुषांचें वर्णन करीत असतांना "एका क्रिया द्व्यर्थकरी प्रसिद्धा" एका कामांत दोन कामें साधणें असें करीत असतात. पण भगवान् श्रीकृष्ण हे एकाच कामांत आणखीही किती तरी कामें साधीत असल्याचें दिसून येतें. महाभारतांतील सभापर्वात राजसूय यज्ञाच्या वेळी श्रीकृष्णांनीं अग्रपूजेच्या निमित्तानें त्यांची अमर्याद निंदा करणाऱ्या व शेवटीं तर त्यांना युद्धासही आव्हान करणाऱ्या चेदिपति शिशुपालाला ठार मारलें आहे. शिशुपालाला ठार मारणें ही वास्तविक दिसावयास अतिशय स्वाभाविक अशी एक सामान्य घटना आहे. एकानें श्रीकृष्णांचा अधिक्षेप केला. त्यांना तो नाहीं नाहीं तें टाकून बोलला व शेवटीं स्वतः होऊन त्यानें त्यांना युद्धाचें आव्हान केले व रागावलेल्या श्रीकृष्णांनीं त्याला ठार मारून टाकलें. एवढेंच वरून दिसावयास या घटनेचें साधें स्वरूप आहे. पण परिणामावरून कृत्याचा विचार व त्याचें मूल्यमापन केलें तर या घटनेची खरी कल्पना येते. एका शिशुपालाला ठार मारण्यांत त्यांनीं पुढील गोष्टी साधल्या आहेत :—

(१) खऱ्या क्षत्रियाप्रमाणें आव्हान स्वीकारून शत्रूला ठार मारण्यांत धर्माचें पालन केलें. (२) द्वारकेवर हवे तसे अत्याचार करणाऱ्या समाजकंटकाला ठार करून सदाचा एक उपद्रव नाहींसा केला. (३) सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे "युधिष्ठिराच्या नव्या साम्राज्य सत्तेचा आम्ही केवळ प्रेमानें स्वीकार केलेला आहे हा केवळ त्याच्यावरच उपकार आहे, वस्तुतः, या नव्या सत्तेजवळ आम्हीं भ्यावें असें तिच्याजवळ फारसें सामर्थ्य नाहीं, अशी समजूत करून

घेतलेल्या राजे लोकांच्या अंतःकरणांत या वधानें नव्या सत्तेचा धाक उत्पन्न करून तिचें आसन दृढमूल केलें. कोणत्याही सत्तेला पहिल्याप्रथम दृढमूल व्हावयास आपल्या सामर्थ्याचा अपूर्व धाक व त्यांतून उत्पन्न होणारा एक प्रकारचा वचकच उपयोगी पडतो. म्हणून प्रत्येक राजनीतिधुरंधर सत्ताधारी ही गोष्ट केल्याविना राहात नाहीं असें जगांतील सत्तासंस्थापकांचा इतिहास सांगतो. शेवटीं समाजधारणा बळाच्या धाकानेंच होत असते. "दण्डस्य हि भयात्सर्वं जगद्भोगाय कल्पते" हा सृष्टीचा अनादि कालापासूनचा सिद्धांत आहे.

भगवान् श्रीकृष्णांच्या अपूर्व बुद्धिमत्तेचें व कार्यकौशल्याचें असेंच दुसरें मोठें उदाहरण द्रोणपर्वांतील घटोत्कचवधाचें आहे. द्रोणपर्वांतील रात्रींच्या युद्धाच्या प्रसंगांत कर्णाच्या शक्तीचें बलिदान म्हणून घटोत्कचाला भगवान् श्रीकृष्णांनीं कर्णावर पाठविलें. त्याच्या राक्षसी सामर्थ्यासमोर दुसऱ्या कोणत्याही शस्त्राचा उपयोग नसल्यामुळें महेंद्रानें दिलेल्या आपल्या शक्तीचा उपयोग करून कर्णानें घटोत्कचाला ठार मारलें पण एका घटोत्कचाला मारविण्यांत श्रीकृष्णांनीं किती कामें साधलीं तें पहाण्यासारखें आहे.

(१) कर्णाची अमोघ शक्ति घटोत्कचावर वाया घालवून अर्जुनाची प्राणभयाची भीति त्यांनीं सदाची नष्ट केली व उलट कर्णासारख्या अत्यंत महत्त्वाच्या शत्रूचा वध सोपा करून ठेविला. ते स्वतःच अर्जुनाला असें म्हणतात (द्रोणपर्व अ. १८०–१२) कीं, "हे अर्जुना, कर्णाची अमोघ शक्ति घटोत्कचावर खर्ची पडल्यामुळें तो आतां युद्धांत जवळजवळ ठार झालाच आहे असें समज. शक्ति हातांत असतांना कार्तिकेयाप्रमाणें सामर्थ्यशील असलेल्या कर्णाला कोण युद्धांत आव्हान देऊं शकेल? " कर्णाचें महत्त्व भारतीय युद्धांत किती होतें हें मी माझ्या महाभारतावरील व्याख्यानें या ग्रंथांत कर्णाचें व्यक्तिचित्र रेखाटतांना सांगितलेंच आहे. एका कर्णाची शक्ति जातांबरोबर कौरवपक्षाचा पराभव व पांडवपक्षाचा जय या दोन्ही गोष्टी निश्चित झालेल्या आहेत.

(२) घटोत्कचाला ठार मारणें भगवान् श्रीकृष्णांना आवश्यकच वाटत होतें. ते स्वतःच म्हणतात (द्रोणपर्व अ. १८१–२७, २८) :

"हा ब्राह्मणद्वेषी, यज्ञाचा द्वेष करणारा, धर्माचा लोप करणारा पापात्मा घटोत्कच मला ठार मारावयाचाच होता. कारण जे जे धर्माचा लोप करणारे आहेत ते ते सर्व मला वध्य आहेत. धर्माच्या स्थापनेसाठीं मी ही प्रतिज्ञा केलेली आहे. म्हणून मी या महेंद्राच्या शक्तीनें बुद्धयाच कर्णाकडून घटोत्कच मारविला." तात्पर्य, धर्मद्वेषी लोकांचा वध करणें हें जें अत्यंत महत्त्वाचें असें त्यांचें अवतारकार्य तें त्यांनीं घटोत्कचाच्या वधानें अंशतः पूर्ण केलें.

(३) जर कर्णानें घटोत्कचास मारलें नसतें तर श्रीकृष्णांना स्वतःलाच त्याला ठार मारावें लागलें असतें. केवळ पांडवांच्या प्रेमासाठींच श्रीकृष्णांनीं त्याला यापूर्वी मारलें नव्हतें. पण अवतार-कृत्याचा आवश्यक भाग म्हणून तें प्रेम बाजूला ठेवूनही त्यांनीं घटोत्कचाचा वध केलाच असता इतकें तें त्यांना स्वतःचें आवश्यक कर्तव्य वाटत होतें. ते म्हणतात (द्रोणपर्व अ. १८१–२४ ते २६) कीं,

"मी युक्तीनें कर्णाकडून या अमोघ शक्तीनें घटोत्कचाला ठार मारविलें. जर या युद्धांत कर्णानें घटोत्कचास मारलें नसतें तर मी स्वतःच त्याला ठार मारलें असतें. केवळ तुमचें प्रिय व्हावें म्हणून मी त्याला आजवर मारलें नव्हतें." पण ज्या पद्धतीनें त्यांनीं घटो-त्कचाला मारलें त्यांत पांडवांचें प्रेम राखलें, स्वतःवरचा लोकापवाद टाळला, वध्य तर मारला पण तो परस्पर मारवून स्वतः अगदीं निर्लेप राहिले. केवढी ही विलक्षण कार्यकुशलता !

भगवान् श्रीकृष्णांच्या विभूतिमत्त्वाच्या आणखी कांहीं अपूर्व वैशिष्ट्यांचा परिचय आपण पुढील व्याख्यानांत करून घेऊं.

# श्रीकृष्णांचा आदर्श

व्यक्तिगत व सार्वजनिक जीवनाच्या सर्व अवस्थेंत भगवान् श्रीकृष्ण हे पुरुषोत्तम होते असें आपणांस आढळून येतें. ते आदर्श पुत्र होते, आदर्श बंधु होते, आदर्श मित्र होते, आदर्श शत्रु होते, आदर्श वल्लभ होते. त्यांच्या आदर्श नेतृत्वाचे कांहीं गुणविशेष आपण पाहिले आहेत. आणखीही कांहीं पाहूं.

## आदर्श पुत्र

भगवान् श्रीकृष्णांना श्रीरामचंद्राच्याप्रमाणें पित्यासाठीं राज्याचा त्याग करून वर्षानुवर्ष वनवासांत जाण्याचा प्रसंग आला नाहीं. त्यामुळें श्रीरामचंद्रांच्या चरित्रांत अयोध्याकांडाचें एक प्रकरणच्या प्रकरण जसें त्या विशिष्ट आदर्शाच्या रीतीनें उजळून निघालें आहे तसें भगवान् श्रीकृष्णांच्या जीवनांत होण्याचें कारण पडलें नाहीं. पण वयाच्या लहानग्या अवस्थेंतच आपल्या पित्याचा दुःस्वास करणाऱ्या दुष्ट सत्ताधिपाला ठार मारून त्यांनीं पित्याच्या संबंधांतील अन्यायाचा सत्पुत्राला योग्य असाच सूड घेतलेला असून त्यानंतर यादवांच्या गणराज्याचे मुख्य म्हणून जीवन घालवितांना व्यावहारिक जीवनांत वसुदेवाचें स्थान अतिशय योग्य रीतीनें संभाळलेलें होतें.

भगवान् श्रीकृष्ण आपले वडील वसुदेव यांच्या अंतःकरणाला किती जपत असत याचें आश्वमेधिक पर्वांत एक उदाहरण आहे. महाभारत हा ग्रंथ मुख्यतः सामाजिक संघर्षाचेंच वर्णन करणारा असल्यामुळें व्यक्तिजीवनाच्या छटांचें त्यांत जरी वर्णन आढळत असलें तरी रामायणाप्रमाणें त्यांत ठसठशीतपणें नित्य जीवनाच्या छटा एकदम दृष्टीस पडत नाहींत. तरीपण सूक्ष्मपणें कोणी त्या पहाण्याचा प्रयत्न केला तर त्या आढळतील. भारतीय युद्ध संपल्यानंतर सुभद्रेला घेऊन भगवान् श्रीकृष्ण द्वारकेंत पहिल्याप्रथमच ज्या

---

व्याख्यान १३ वें व १४ वें, दिनांक ९ व १०–४–५२

वेळीं गेले, त्या वेळीं स्वाभाविकपणेंच वसुदेवांनीं त्यांना महायुद्धाचा सर्व वृत्तांत विचारला. तो वृत्तांत सांगत असतांना श्रीकृष्ण वसुदेवांच्या मनोवृत्तींना किती जपत होतें याचें महाभारतांत (आश्वमेधिक पर्व, अ. ५९ व ६१) वर्णन करतांना महाभारतकार म्हणतातः–

"भेटीला आलेल्या सर्व यादवांचें यथावत् कुशल विचारून भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या मातापित्यांना वंदन केलें. नंतर वसुदेवांनीं त्यांना विचारल्यावर भारतीय महायुद्धाचा इतिहास श्रीकृष्णांनीं त्यांना सांगितला. परंतु युद्धाचा सारा इतिहास पित्याला सांगत असतां नेमका अभिमन्यूचा वध मात्र त्यांनीं गाळला. आपल्या वडिलांना ती गोष्ट ऐकून अतिशय वाईट वाटेल असें भगवान् श्रीकृष्णांना वाटलें व म्हणूनच त्यांनीं ती गोष्ट सांगण्याचें टाळलें. वसुदेवांच्या भावभावनांना ते किती जपत असत हें यावरून अगदीं स्पष्ट होतें. श्रीमत् भागवतांत तर आपल्या मातापित्यांच्या हृदयाला आनंद देण्यासाठीं स्वतःचें दैवी सामर्थ्य प्रकट करून भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या मृत बंधूंचेंही त्यांना दर्शन घडवून दिल्याचें वर्णन आहे. या आपल्या प्रत्यक्ष मातापित्यांइतकेंच भगवान् श्रीकृष्णांचे लहानपणचे पालनकर्ते नंद यांच्यावरही त्यांचें विलक्षण प्रेम होतें. एकदा गोकूळ सुटल्यावर भगवान् श्रीकृष्णांना, एकामागून एक महान् संघर्षांशीं त्यांची गांठ पडल्यामुळें, पुन्हां म्हणून गोकुळाकडे जातांच आलें नाहीं. पण प्रभास क्षेत्रावर त्यांची व नंदयशोदेची गांठ पडल्यावर भावभावनांना जो विलक्षण पूर आला त्याचें भागवतांत अतिशय मनोरम चित्रण आहे.

## आदर्श बंधु

भगवान् श्रीकृष्ण जसे आदर्श पुत्र होते तसेच ते आदर्श बंधूही होते. त्यांचें व बलरामाचें परस्पर प्रेम आदर्श बंधुप्रेमाचें जगांतील एक उपमान बनून राहिलें होतें असें आढळून येतें. कुंती कर्णाला 'तूं व अर्जुन एकत्र आलांत तर जगाला तुमची जोडी बलराम व श्रीकृष्णाप्रमाणें आदर्श होईल' असें सांगतें. (उद्योगपर्व अध्याय १४५-१०) बलराम व श्रीकृष्ण यांचें विलक्षण बंधुप्रेम मराठी कवींच्या

कुतूहलाचा नेहमींचाच विषय झालेलें असून कविवर्य सामराजानें आपल्या 'रुक्मिणीहरण' काव्यांत या बंधुप्रेमाचें वर्णन करतांना कृष्ण बलराम हे एकाच ताटांत जेवत असत असेंही वर्णन केलेलें आहे. सुदेव ब्राह्मण ज्या वेळीं गोकुळांत श्रीकृष्णास भेटावयास गेला त्या वेळीं त्यानें जें दृश्य पाहिलें त्याचें वर्णन करतांना सामराज म्हणतो: "हलधर हरि दोघे बैसती एकताटी." श्रीमत्भागवतांत (दशमस्कंध अ. १०) तर लहानपणीसुद्धां बलराम हे वडील बंधु म्हणून श्रीकृष्ण त्यांची कशी सेवा करीत असत याचें पुढीलप्रमाणें वर्णन आहे :–

"केव्हां केव्हां बराच वेळ खेळून थकल्यावर बलराम आपल्या मित्राच्या मांडीवर डोकें टेकून पडले असतां, श्रीकृष्णांनीं स्वतः त्यांचे पाय चेपून त्यांचा थकवा घालवावा." बलरामाची मान-मर्यादा भगवान् श्रीकृष्ण भावना उचंबळून सोडणाऱ्या प्रसंगांतसुद्धां किती कसोशीनें पाळीत असत, व स्वतःला त्यापासून दुःख झालें आणि एखादी गोष्ट बोलण्याचा प्रसंग असला तरीसुद्धां श्रीकृष्ण तें कसें टाळीत याचें हरिवंशांत उत्कृष्ट चित्रण आहे. भगवान् श्रीकृष्णांच्या रुक्मिणीस्वयंवरांतील पराक्रमासमोर रुक्मिणीचा भाऊ रुक्मी याला हार खावी लागल्यामुळें त्यानें विदर्भ राजनगरींत प्रवेश न करतां भोजकट नांवाचें नवें नगर वसविलें व तेथें तो राहूं लागला याचा उल्लेख मागें एका व्याख्यानांत केलेलाच आहे. पुढें कांहीं दिवसानंतर भगवान् श्रीकृष्णांना रुक्मिणीपासून प्रद्युम्न या नांवाचा मुलगा झाला. तो श्रेष्ठ पराक्रमी म्हणून सर्वत्र प्रसिद्ध होता. भोजकटांत राहणाऱ्या रुक्मीलाही एक अतिशय अप्रतिम लावण्य-संपन्न मुलगी होती. तिचें नांव शुभांगी. रुक्मीनें त्या मुलीचें स्वयं-वर ठरविलें. प्रद्युम्न त्या स्वयंवरास उपस्थित राहिला. पराक्रमानें तो विख्यात होता. रूपानें तो अप्रतिम होता व शिवाय त्याच्या पाठीशीं श्रीकृष्णांची कीर्ति होती. शुभांगीनें इतर सर्व राजपुत्रांना डावलून त्याच्याच गळ्यांत वरमाला समर्पण केली. रुक्मिणी-हरणामुळें व विशेषतः शेवटीं त्यांत झालेल्या पराभवामुळें रुक्मीला श्रीकृष्णांचा केवढाही राग आला असला तरी मुलीनें जें केलें तें योग्यच केलें असें वाटून जुनें वैर मनांत न ठेवतां त्यानें तो विवाह

मोठ्या थाटानें पार पाडला. प्रद्युम्नाच्या या विवाहानंतर रुक्मी व श्रीकृष्ण यांचें वैर असें राहिलें नाहीं, व परस्परस्नेहाचे संबंध उत्पन्न झाले. पुढें प्रद्युम्नाला शुभांगीपासून अनिरुद्ध नांवाचा मुलगा झाला. हा अनिरुद्ध आपल्या पित्याप्रमाणें व आजोबाप्रमाणें अतिशय सुंदर असून धनुर्वेद, नीतिशास्त्र व वेदविद्या यांतही पारंगत होता. तो महान् पराक्रमी होता. प्रभासक्षेत्रावर श्रीकृष्ण व प्रमुख यादव यात्रेसाठीं गेले असतां व द्वारकेला शत्रूंचें सदोदित भय असतां तिच्या संरक्षणाचा भार श्रीकृष्णांनीं अनिरुद्धावरच सोंपविला होता असें भागवतांत वर्णन आढळतें. या महापराक्रमी अनिरुद्धाचें रुक्मीची नात श्रीमती हिच्याशीं लग्न झालें. बहीण रुक्मिणी व जांवई प्रद्युम्न यांच्या प्रेमासाठीं व अनिरुद्धाची योग्यता ओळखून पूर्वीचें सर्व वैर मनांतून काढून टाकून रुक्मीनें हा संबंध जुळविला. या विवाहप्रसंगीं द्वारकेंतील बहुतेक यादववीर रुक्मीच्या भोजकट नगरांत आले होते. त्या सर्व लोकांचा रुक्मीनेंही मोठा आदरसत्कार केला. विवाहमंगल संपल्यावर कलिंग देशाच्या राजाच्या आग्रहानें थट्टा करावी म्हणून श्रीकृष्ण मंडपांत नसतांना रुक्मीनें बलरामांना द्यूत खेळावयास बोलाविलें. त्या द्यूतांतील हरणें व जिंकणें या प्रकारांत एकमेकांचा मर्मभेदी उपहास सुरू झाला. त्या उपहासानें बलराम संतापले व रुक्मीचें व आपलें नवें जुळलेलें नातें आणि त्याच्या अपराधाचें क्षुद्र स्वरूप विसरून त्यांनीं रुक्मीला व त्याच्या मित्रांना तेथेंच पडलेल्या एका लोखंडी कांबेनें ठार मारलें. विवाहमंडपांतून आपल्या शिबिरांत येऊन घडलेलें वृत्त अगदीं सहजपणें त्यांनीं श्रीकृष्णांना सांगून टाकलें. कांहीं विशेष अपराध नसतां व्याह्यालाच बलरामांनीं ठार मारावें ही गोष्ट मुळींच समर्थनीय नव्हती. श्रीकृष्णांना तर रुक्मिणी, प्रद्युम्न, त्याची पत्नी शुभांगी, अनिरुद्ध व नुकतीच घरांत आलेली नववधू श्रीमती यांच्या मनावर त्या गोष्टीचा केवढा विलक्षण परिणाम होईल याची पूर्ण कल्पना होती. शिवाय लोकांतही आपल्यासंबंधीं केवढे अपसमज पसरतील हेंही त्यांना दिसत होतें. शिवाय बिचारा रुक्मी उगाचच मारला गेला याचेंही त्यांना अत्यंत दुःख झालें. पण केवळ

बलरामांना वाईट वाटूं नये म्हणून त्यांनीं त्यांना कांहीं म्हटलें तर नाहींच; पण चेहऱ्यावर नापसंतीचा भावही दर्शविला नाहीं. उलट दुःखामुळें आपल्या डोळ्यांतून बलरामासमोर अश्रू कसे येणार नाहींत याचीच आत्यंतिक दक्षता घेतली. हरिवंशकार ( विष्णुपर्व अ. ६१–५२ ) या प्रसंगाचें वर्णन करतात कीं,

"तेजस्वी श्रीकृष्ण बलरामांना एका अक्षरानेंही बोलले नाहींत. आपलें मन त्यांनीं पूर्णपणें आवरलें व अतिशय कष्टानें डोळ्यांतील अश्रू रोखून धरले. साध्या थट्टेंत आपल्या भावाचा मृत्यु घडला हें पाहून बिचारी रुक्मिणी करुण विलाप करूं लागली. पण श्रीकृष्णांनीं स्वतः तिचें सांत्वन केलें. श्रीकृष्णांच्या या विलक्षण बंधुप्रेमाचाच हा प्रताप होता कीं, सुभद्राहरणांत त्यांच्या विरोधांत बलराम कांहीं बोलले नाहींत व मनांतून शिष्य म्हणून राजा दुर्योधनाविषयीं त्यांच्या अंतःकरणांत प्रेम असतां, इतकेंच नव्हे तर त्यालाही साहाय्य करावें अशी त्यांची प्रबळ इच्छा असतांही केवळ श्रीकृष्णांसाठीं त्यांच्यावरील आत्यंतिक प्रेमामुळें ते तीर्थयात्रेस निघून गेले.

पांडवांची बाजू उपप्लव्य नगरांत अभिमन्यूच्या विवाहार्थ जमलेल्या लोकांसमक्ष मांडीत असतां बलरामांच्या उद्गारांवरून ते दुर्योधनाला अनुकूल आहेत हें श्रीकृष्णांच्या ध्यानांत आलें. पण श्रीकृष्णांनीं स्वतः त्यांच्या बाबतींत कांहींही बोलावयाचें नाहीं व त्यांना विरोधही करावयाचा नाहीं, केवळ मौन स्वीकारावयाचें असें धोरण ठेवून वर्तणूक केली. बलरामांनीं काय ओळखावयाचें तें ओळखलें. साहाय्य मागावयास दुर्योधन त्यांच्याकडे आला असतां ते त्याला सांगतातः (उद्योगपर्व अ. ७–२६ ते ३०) "हे नरव्याघ्रा, तूं म्हणतोस तसेंच वस्तुतः व्हावयास पाहिजे. तुझ्यासंबंधानें मी अभिमन्यूच्या विवाहाचे वेळीं श्रीकृष्णांना पुनःपुन्हां स्पष्टपणें सांगितलें; पण माझें म्हणणें विचारांत घ्यावयाचेंच नाहीं असें त्यानें ठरविलेलें दिसतें. माझी तर अवस्था अशी आहे कीं, क्षणभर सुद्धां श्रीकृष्णावांचून मी राहूं शकत नाहीं. त्यामुळें त्याच्याकडे पाहून मीं असें ठरविलें आहे कीं, पांडव व कौरव यांपैकीं कोणालाच

साहाय्य द्यावयाचें नाहीं. भरताच्या विख्यात वंशांत तूं उत्पन्न झालेला आहेस. शुद्ध क्षत्रिय धर्माप्रमाणें युद्ध कर." नुसतें दुर्योधनालाच बोलून त्यांच्यानें राहवलें नाहीं तर कृष्णाच्या समोर आपलें म्हणणें एकदां युधिष्ठिराच्याही कानावर घालावे म्हणून तीर्थयात्रेला जाण्यापूर्वी ते युधिष्ठिराच्या भेटीस्तव बुद्धचा गेले व श्रीकृष्ण ऐकत असतां त्यांना म्हणाले (उद्योगपर्व अ. १५७–२८) :

" हे युधिष्ठिरा, मी वारंवार या श्रीकृष्णाला असें सांगितलें कीं, आपल्याला जसे पांडव आहेत तसाच दुर्योधनही आहे. आपल्या नातलगांशीं आपण समभावनेनेंच वागलें पाहिजे. आपल्याला त्यांच्यांत भेद करावयाचें कारण नाहीं. दुर्योधनाला सुद्धां साहाय्य करणें हें तुझें कर्तव्य आहे. पण ह्यानें केवळ तुझ्यासाठीं माझ्या म्हणण्याकडे मुळींच लक्ष दिलेलें नाहीं. अर्जुनावर याचें आत्यंतिक प्रेम आहे व त्या विलक्षण प्रेमास्तव तो या संबंधांत माझें म्हणणें प्रत्यक्षांत आणूं इच्छीत नाहीं. ज्या अर्थी श्रीकृष्णांचा तुमच्या पक्षाच्या वतीनें इतका विलक्षण अभिनिवेश आहे, त्या अर्थी युद्धांत पांडवांचाच जय होणार ही गोष्ट निश्चित आहे. पण श्रीकृष्णावांचून जगाकडे पहाण्याची सुद्धां माझी इच्छा नाहीं. मला तें शक्यच नाहीं. त्यामुळें याच्याच इच्छेप्रमाणें होऊं द्या." श्रीकृष्णावरील या आत्यंतिक प्रेमामुळेंच मांड्या मोडून दुर्योधन पडला असतां भीमावर संतापून त्याला ठार मारावयास निघालेले बलराम केवळ कृष्णाकडे पाहून द्वारकेला परतले. महाभारतकार म्हणतात: (शल्यपर्व अ. ६०) "भीमानें दुर्योधनाच्या मस्तकावर लाथ मारलेली पाहून बलराम अतिशय संतापले. त्या सर्व मंडळींत आपला हात उंच उभारून 'भीमाचा धिक्कार असो, धिक्कार असो,' अशी त्यांनीं गर्जना केली. त्यांचे नेत्र क्रोधानें लाल झाले व क्रोध आवरेनासा होऊन श्रीकृष्णाकडे वळून ते म्हणाले : हा अधार्मिक भीम, जें कृत्य करीत आहे तें मुकाट्यानें सहन केल्यास, सहन करणाऱ्या लोकांवर त्याचा दोष येईल." आपलें आयुध हातांत घेऊन भीमावर तुटून पडण्यासाठीं ते धांवले. तो भीमाच्या मृत्यूचा प्रसंग पाहून विनयानें भगवान् श्रीकृष्ण धांवतच बलरामाजवळ गेले व आपल्या दोन्ही

हातांची घट्ट मिठी त्यांना घालून त्यांनीं त्यांना आवरलें. एक श्यामल वर्णाचा व एक गौर वर्णाचा असे ते दोघे यदुश्रेष्ठ संध्याकाळच्या वेळीं आकाशांत एकत्र आलेले चंद्रसूर्य जसे शोभतात तसे दिसू लागले. श्रीकृष्णांनीं त्यांना सांगितलें, "महाराज, आपण धर्मात्मा व धर्मवत्सल असून तुम्ही राग पूर्णपणें जिंकला अशी लोकांत प्रसिद्धि आहे. माझ्याकडे पहा आणि भीमावरील राग आवरा. बलरामांना शेवटीं राहवलें नाहीं. ते म्हणाले : "अधर्मानें दुर्योधनाला मारणारा हा भीम कपटयोद्धा होता असें लोक म्हणतील." कृष्णाकडे पाहूनच त्यांनीं आपला राग आवरला व ते द्वारकेकडे निघून गेले. कृष्णबलरामांच्या करुणामय बंधुप्रेमाचें चित्रण मौसल पर्वांतही आढळतें. प्रभास क्षेत्रावर सर्व यादववीर संपले असतां रणक्षेत्रावर बलराम कोठेंही दिसत नाहींत असें पाहून श्रीकृष्ण त्यांच्या शोधास्तव निघाले. दूर अंतरावर बलराम त्यांना दिसले. त्या सर्व प्रसंगाचें वर्णन करतांना महाभारतकार (मौसलपर्व अ. ४) म्हणतात:–

"शेवटचा यादव अक्रूर मुसळाच्या आघातानें संपलेला पाहून श्रीकृष्ण बलरामांना म्हणाले "आपण माझी येथेंच वाट पहा. मी स्त्रियांना योग्य लोकांच्या स्वाधीन करून येतों." नंतर द्वारकेंत प्रवेश करून आपल्या वडिलांना श्रीकृष्णांनीं सांगितलें कीं, अर्जुन येईपर्यंत या स्त्रियांचें तुम्ही संरक्षण करा. वनांत दादा माझी वाट पहात आहेत. मी त्यांना जाऊन भेटतों. मी इतक्या कुलनाशानंतर आतां येथें राहूं इच्छीत नाहीं. रामांच्याबरोबर मी वनांत तपस्येप्रीत्यर्थ जातों." तेथून परत वनांत येऊन बलराम निजस्वरूपी विलीन झालेले त्यांनीं पाहिलें. राम गेल्याचें पहातांच आपली जीवितयात्रा संपविण्याचा तोच योग्य काल समजून त्यांनीं ध्यानस्थ होऊन सर्व बाह्य वृत्तींचा निरोध केला." तात्पर्य, लौकिक जीवन या दृष्टीनें विचार केला तर बलरामानंतर क्षणमात्रही पृथ्वीवर राहण्याची भगवंतांना इच्छा उरली नाहीं. सर्वांचा ते त्याग करूं शकले पण रामांच्या त्यागाची कल्पनाही त्यांच्या मनाला शिवली नाहीं असें दिसून येतें.

## आदर्श मित्र

भगवान् श्रीकृष्ण हे जसे आदर्श बंधु, तसेच ते आदर्श मित्रही होते. त्यांच्या या गुणवैशिष्टयाच्या छटा त्यांच्या वैयक्तिक व राजनैतिक अशा दोन्ही प्रकारच्या जीवनांत दृष्टोत्पत्तीस येतात. त्यांच्या वैयक्तिक जीवनांतील अपूर्व मित्रत्वाचें निदर्शन असणारी गोष्ट म्हणजे श्रीमत्भागवतांतील दशमस्कंधांत आलेलें सुदाम्याचें चरित्र होय.

सुदामा नांवाचा एक दरिद्री ब्राह्मण भगवान् श्रीकृष्णांचा मित्र होता. ह्या मित्राचा आणि श्रीकृष्णांचा संबंध ते सांदीपनीच्या घरीं विद्याभ्यासासाठीं असतांना आला. सुदामा हा आपल्या उत्तर आयुष्यांत केवळ एक दरिद्री ब्राह्मण होता, तर श्रीकृष्ण सकलैश्वर्य-संपन्न भगवान् म्हणून विख्यात होते. पण आयुष्याच्या उत्तरार्धांत हा सुदामा श्रीकृष्णांच्या भेटीस्तव द्वारकेंत गेला असतां त्याच्या-सारख्या अठराविश्वें दरिद्री असलेल्या, फाटकीं लक्तरें पांघरणाऱ्या ऐश्वर्यहीन व्यक्तीचें ज्या विलक्षण उत्कट प्रेमभावनेनें त्यांनीं स्वागत केलें व त्याला सर्वस्वाचें दान केलें, त्याची मिठी प्रतिभा-संपन्न भारतीय कवींच्या मनावर इतकी विलक्षण बसलेली आहे कीं सूरदासासारख्या महाकवींनीं आजही या घटनेचें डोळ्यांत पाणी आणणारें वर्णन केलेलें असून मोरोपंतांसारख्या कवींच्या प्रतिभे-लाही फुलोरा आलेला आहे. सुदाम्याची कथा सर्वत्र प्रसिद्ध असून ती लोकांच्या इतकी तोंडी आहे कीं, ती मी पुन्हां येथें सांगितली पाहिजे असें नाहीं.

महाभारतांत भगवान् श्रीकृष्णांचा विख्यात असलेला मित्र अथवा सखा म्हणजे अर्जुन होय. कौटिल्यानें आपल्या अर्थशास्त्रांत मित्राचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे:—

> **नित्यं वश्यं लघूत्थानं पितृपैतामहं महत् ।**
> **अद्वैध्यं चेति सम्पन्नं मित्रं षड्गुणमुच्यते ।।**
> **ऋते यदर्थं प्रणयाद् रक्ष्यते यच्च रक्षति ।**
> **पूर्वोपचितसम्बन्धं तन्मित्रं नित्यमुच्यते ।।**

**सर्वचित्रमहाभोगं त्रिविधं वश्यमुच्यते ।**
**एकतो भोग्युभयतः सर्वतो भोगि चापरम् ।।**

—कौटिलीय अर्थशास्त्र अध्याय १०७

"कायम टिकणारा, अनुकूल, सहज किंवा अल्पप्रयासानें सज्ज होणारा, वाडवडिलांपासून स्नेह चालत आलेला, वैभवशाली आणि प्रतारणा न करणारा असे हे मित्राच्या अंगचे सहा गुण सांगितले आहेत. जो पैशाच्या लालुचीनें नव्हे तर केवळ प्रेमाखातर मैत्री करतो आणि जो पूर्वापार चालत आलेला स्नेहसंबंध कायम ठेवतो तोच कायम टिकणारा मित्र होय. ज्या संपन्न मित्राची दंडकोश-भूमिरूपी संपत्ति सर्व प्रकारांनीं उपभोगितां येते तो त्रिविध वश्य अथवा अनुकूल मित्र म्हणावा. यांतून एकेक लाभ कमी अधिक असेल त्या मानानें त्यास एकतो भोगी, उभयतो भोगी, किंवा सर्वतो भोगी म्हणावें."

कौटिल्याच्या या मित्रलक्षणांत राज्यशास्त्राचा खरा संबंध आहे. त्यामुळें महाभारतांतील श्रीकृष्णांच्या संपूर्ण जीवनाला यांतलें प्रत्येक लक्षण लावून पहाण्यासारखें आहे. श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या मित्रत्वांत टिकाऊपणा किती विलक्षण होता हें स्वतंत्र सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. त्यांच्या संपूर्ण जीवनांत अर्जुनाशीं विरोध येण्याचा तर कधीं प्रसंगच आलेला नाहीं. पण अर्जुनही जणू कीं कांहीं, लक्ष्मण जशी श्रीरामचंद्रांची, तशीच श्रीकृष्णांची एक महान् व अमोघ अशी कार्यशक्ति आहे. जीवनाच्या अंतिम क्षणीं सुद्धां द्वारकेच्या पुढील व्यवस्थेचा भार त्यांनीं अर्जुनावरच सोंपविलेला आहे. त्या तशा विलक्षण प्रसंगीं स्वजनांचे बंध तोडून जात असतां त्यांना त्यांनीं अर्जुनाच्या स्वाधीन राहावयास सांगितलें आहे. महाभारतकार म्हणतात ( मौसलपर्व अ. ४ ):—

"हे दारुका, तूं त्वरित कौरवांकडे जाऊन अर्जुनाला यादवांच्या सर्वनाशाचें वृत्त सांग. यादवांचें हें वृत्त ऐकून अर्जुन तात्काळ येथें येईल." याप्रमाणें श्रीकृष्णांनीं दारुकाला आज्ञा दिल्यावर तो हस्तिनापुराला निघून गेला. नंतर आपल्या पित्याची भेट घेऊन भगवान् श्रीकृष्ण त्यांना म्हणाले: "आपण सर्व यादव स्त्रियांचें

संरक्षण करीत अर्जुनाची वाट पाहात राहा. वनांत बलराम माझी वाट पहात आहेत. मी त्यांच्याकडे जातों." श्रीकृष्ण जाण्यासाठीं वळले तोंच स्त्रिया आणि मुलें यांचा विलक्षण विलाप सुरू झाला. ते त्यांचे आर्त आक्रंदन ऐकून श्रीकृष्ण त्यांच्याकडे वळले व त्यांनीं त्यांना सांगितलें, "अर्जुन येथें येईल व तो पुरुषश्रेष्ठ तुमचें सांत्वन करून तुम्हांला संरक्षण देईल." डोळ्यांत तेल घालून ज्यांनीं अर्जुनाचें जन्मभर संरक्षण केलें त्या श्रीकृष्णांचा अर्जुनावर केवढा विलक्षण भरंवसा होता. अर्जुनाविषयींच्या आपल्या भावना या शेवटच्या प्रसंगीं व्यक्त करीत असतां भगवान् श्रीकृष्ण आपल्या पित्याला सांगतात :

**योऽहं तमर्जुनं विद्धि योऽर्जुनः सोऽहमेव तु ॥ २१**
**यद् ब्रूयात्तत्तथा कार्यमिति बुध्यस्व भारत ॥ २२**

—महाभारत मौसल अ. ६.

"अर्जुन म्हणजेच मी व मी म्हणजेच अर्जुन होय. आम्हां दोघांच्यांत किंचित्मात्रही भेद नाहीं. जें जें अर्जुन म्हणेल तसें तसें सर्वांनीं वागावें." श्रीकृष्णांचें अर्जुनाशीं मित्रत्व याप्रमाणें सतत टिकणारें आहे. ते अर्जुनाला जितके अनुकूल आहेत तितके कोणालाच नाहींत. एक तर तें मित्रत्व कुंतीमुळें वाडवडिलां-पासून चालत आलेलें आहे. तें किती प्रगाढ आहे याची साक्ष त्यांनीं वेळोवेळीं काढलेले उद्गारच देतात. पांडवांच्याशीं आपण किती एकरूप झालों आहोंत हें दुर्योधनाला सांगतांना ते म्हणतात :

**यस्तान् द्वेष्टि स मां द्वेष्टि यस्तामनु स मामनु ।**
**ऐकात्म्यं मां गतं विद्धि पाण्डवैर्धर्मचारिभिः ॥ २८**

—महाभारत, उद्योगपर्व अध्याय ९१

"जो कोणी पांडवांचा द्वेष करतो तो माझाही द्वेष करतो, व जो त्यांना अनुकूल आहे तो मलाही अनुकूल आहे असें समज. धर्मानुसार वर्तन करणाऱ्या पांडवांशीं मी पूर्णपणें एकरूप झालेलों आहे." भीष्माशीं झालेल्या नवव्या दिवशींच्या युद्धानंतर रात्रींच्या वेळीं पांडवांच्या युद्धसमितीची सभा भरली असतांना भगवान्

श्रीकृष्णांनीं युधिष्ठिरासमोर पुढीलप्रमाणें उद्गार काढलेले आहेत. ते म्हणतात :–

> **यः शत्रुः पाण्डुपुत्राणां मच्छत्रुः स न संशयः ।**
> **मदर्था भववीया ये ये मदीयास्तवैव ते ॥ ३२**
> **तव भ्राता मम सखा सम्बन्धी शिष्य एव च ।**
> **मांसान्युत्कृत्य दास्यामि फाल्गुनार्थे महीपते ॥ ३३**
> **अयं चापि नरव्याघ्रो मत्कृते जीवितं त्यजेत् ।**
> **एष नः समयस्तात तारयेम परस्परम् ॥ ३४**
>
> —महाभारत भीष्मपर्व अ. १०४

" जे तुमचे आहेत ते माझे आहेत व जे माझे आहेत ते तर तुमचे आहेतच. हे युधिष्ठिरा, हा तुझा बंधु अर्जुन, माझा सखा, संबंधी, व शिष्य आहे. अर्जुनासाठीं मी काय देणार नाहीं ? माझें मांस सुद्धां काढून मी अर्जुनासाठीं देईन. व हाही नरव्याघ्र माझ्यासाठीं आपला प्राण देईल. एकमेकांचें एकमेकांनीं संरक्षण करावयाचें व शेवटपर्यंत सांभाळून न्यावयाचें असा आमचा संकेत ठरलेला आहे. "

जयद्रथाच्या वधाची अर्जुनानें प्रतिज्ञा केल्यावर ती त्याच्या हातून पार पडणार नाहीं अशा समजुतीनें भगवान् श्रीकृष्ण सारी रात्र तळमळत होते याचें मागें मी वर्णन केलेंच आहे. रात्रीं दुःखी अंतःकरणानें दारुकाशीं बोलत असतां श्रीकृष्णांनीं अर्जुनाविषयींच्या आपल्या अत्युत्कट भावना व्यक्त केल्या आहेत. ते म्हणतात (द्रोणपर्व अध्याय ७९–२९) :—

" हे दारुका, उद्यां मी असें कर्म करीन कीं, ज्या योगानें कुंतीपुत्र अर्जुन निश्चितपणानें जयद्रथास ठार मारील. मला माझ्या स्त्रिया, इतर कोणीही मित्र, नातलग व बांधव यांपैकीं कोणीही कुंतिपुत्र अर्जुनाहून अधिक प्रिय नाहीं. हे दारुका, अर्जुनावांचून एक क्षणभर सुद्धां या जगांत राहण्याची माझी इच्छा नाहीं व मी तुला निश्चित सांगतों कीं, उद्यां लोकांनीं समरांगणांत माझा पराक्रम पाहावाच. अर्जुनासाठीं उद्यां मी सर्व लोकांना जिंकून, कर्ण, दुर्योधनादि प्रतिपक्षीयांना ठार मारीन. अर्जुनाचा मित्र

कसा असतो हें उद्यां लोकांना कळेल. जो अर्जुनाचा द्वेष करतो तो माझाही द्वेष करतो. जो त्याला अनुकूल आहे त्यानें मला वेगळें अनुकूल राहण्याची आवश्यकताच नाहीं. तो मला अनुकूल आहेच. तुला फार काय सांगूं ? माझें अर्धें शरीर म्हणजे अर्जुन आहे."

द्वारकेंत अश्वत्थामा भेटीला आला असतांना त्याच्याशीं देखील बोलतांना श्रीकृष्णांनीं अर्जुनाविषयींच्या आपल्या याच भावना व्यक्त केल्या आहेत. ते म्हणतात (सौक्तिक पर्व अ. १२–२६):–

"जो सर्व मनुष्यांच्या मध्यें आज तरी सर्वांत श्रेष्ठ आहे, गाण्डीवधन्वा, श्वेताश्व, कपिध्वज, इत्यादि नांवांनीं ज्याचें वर्णन करीत असतात, देवाधिदेव भगवान् शंकराशीं ज्यानें द्वंद्वयुद्ध करून त्यांनाही आपल्या पराक्रमानें प्रसन्न करून घेतलें असा माझा अर्जुन तुला ठाऊक आहेच. तुला फार काय सांगूं ? त्याच्याशिवाय मला या सर्व जगांत अधिक प्रिय असा दुसरा कोणीही नाहीं. स्त्रिया, पुत्र, अथवा इतर कोणतीही वस्तु जी मनुष्याच्या सर्व कोमल भावनांना व्यापून टाकणारी असते ती सुद्धां अर्जुनासाठीं मी टाकून देईन. त्याला न देण्यासारखी माझ्याजवळ कोणतीही वस्तु नाहीं." केवळ प्रेमासाठीं प्रेम असें अर्जुनावर भगवान् श्रीकृष्णांनीं प्रेम केलेलें आहे. फार काय ? अर्जुनासाठीं कमीपणा पत्करून श्रेय त्याच्या पदरांत टाकण्याची त्यांच्या अंतःकरणाची पूर्ण सिद्धता आहे. भारतीय युद्धासाठीं श्रीकृष्णांना साहाय्याची विनंति करावयास अर्जुन त्यांच्याकडे गेला असतां तो त्यांना आपलें सारथ्य करावयास सांगूं लागला. अर्जुनाचें या विषयींचें मनोगत व्यक्त करणारे शब्द अनेक दृष्टींनीं सूक्ष्म विचार करण्या-इतक्या महत्त्वाचे आहेत. अर्जुन श्रीकृष्णांना म्हणतोः (उद्योग-पर्व, अध्याय ७–३५ ते ३७)

"आपण सर्व कौरवांना ठार मारावयास समर्थ आहांत हें मला पूर्णपणें ठाऊक आहे. मी देखील त्यांना मारावयास समर्थ आहे. पण आपण सर्वांत अधिक पराक्रमी म्हणून आपली कीर्ति आधींच जगांत पसरलेली आहे. त्यामुळें युद्धांतील विजयाचें सर्व यश आपणाकडेच

येईल हें निर्विवाद आहे. मला सुद्धां स्वाभाविकपणेंच यश मिळावें अशी इच्छा आहे. आपण माझें सारथ्य करावें अशी पुष्कळ दिवसांपासून माझ्या अंत:करणांत इच्छा आहे. तेवढी आपण पूर्ण करावी म्हणून मी आपण युद्ध करीत नसतांही आपणच मला हवेत असें सांगितलें." याचा अर्थ असा आहे कीं, आपल्या पराक्रमाचें यश चहूंकडे पसरावें अशी एक वीरपुरुष या नात्यानें अर्जुनाची अत्यंत स्वाभाविक इच्छा होती. भगवान् श्रीकृष्णाप्रमाणें यशापयशाच्या अतीत असलेला तो परमेश्वर नव्हता. पराक्रमाचें जसें कर्तृत्व त्याला गाजवावयाचें होतें त्याचप्रमाणें यशाचें भोक्तृत्वही त्याला हवें होतें. श्रीकृष्णांनीं युद्ध केल्यास पूर्णांशानें तें भोक्तृत्व त्याच्या पदरांत पडणार नव्हतें. श्रीकृष्ण लढतोच म्हणाले असते वा त्यांनीं तशी पुसटही इच्छा प्रदर्शित केली असती तरी निश्चितपणें अर्जुन मागें सरला असता. पण अनायासें ते हातांत शस्त्र घेणार नसल्यामुळें निर्विवादपणें तें यश अर्जुनाच्याच पदरांत पडण्याची परिस्थिति चालून आलेली होती. न लढणारे श्रीकृष्ण सारथी म्हणून लाभल्यास 'जगद्विख्यात यशस्वी योद्धा व अजिंक्य पराक्रमी पुरुष ज्याचा सारथी आहे असा महारथी पार्थ' असें त्याच्या वर्णनाचें स्वरूप होणार होतें. तीच गोष्ट त्यानें बोलून दाखविली. श्रीकृष्णांना त्याच्या त्या उद्गारांची मोठी मौज वाटली व ते हंसून त्याला म्हणाले: ( उद्योगपर्व अ. ७-३८ ) "हे पार्था, तूं माझ्याबरोबर स्पर्धा करतीस असें दिसतें. पण हें तुझ्या पराक्रमाला योग्यच आहे. तुझी इच्छा सफळ होईल. मी तुझें सारथ्य अवश्य करीन." 'स्पर्धसे' या शब्दांत श्रीकृष्णांनीं अर्जुनाचा सर्वच भाव पूर्णपणें प्रकट केला आहे. श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या मैत्रींत त्यांच्या अभिजात नेतृत्वाचा एक महान् गुणविशेष प्रकट झालेला आहे. तो म्हणजे स्वत: सारें काम करूनही अनुयायांनाच त्याचें श्रेय देऊन त्यांना फुलविण्याची प्रवृत्ति होय. महाभारतभर याचीं पुष्कळच उदाहरणें विखुरलेलीं आहेत. कांहीं मी येथें उदाहणादाखल देतों:–

वस्तुत: जयद्रथाला ठार मारण्याचें सर्व श्रेय भगवान् श्रीकृष्णांचें आहे. जर त्यांनीं आधींपासूनच सर्व प्रकारची सिद्धता केली नसती,

जर त्यांनीं रणक्षेत्रावरील आपल्या अपूर्व मार्गदर्शनानें सर्व प्रकारचे मोठमोठ्या योद्धयांचे अडथळे डावलून टाकले नसते, जर त्यांनीं वेळेवर आपल्या अद्वितीय सामर्थ्यानें सूर्यच झांकून टाकून कृत्रिम रात्र उत्पन्न केली नसती, जर त्यांनीं मरणाऱ्या सिंधुराज जयद्रथाचें मस्तक नेमकें त्याच्या बापाच्या मांडीवर अर्जुनाकडून टाकविलें नसतें, तर अर्जुनाचें प्रतिज्ञावचन पार खोटें ठरलें असतें व त्याला आपल्या जीवनाचा अंत करण्याविना दुसरा कोणताही मार्ग उरला नसता. सिंधुराज जयद्रथाच्या पित्याला परमेश्वराचें असें वरदान होतें कीं, त्याचें मस्तक जो कोणी जमिनीवर पाडील त्याचें मस्तक फुटून त्याला मृत्यु येईल. भगवान् श्रीकृष्णांनीं त्या वरदानाचा उपयोग करून उभय पितापुत्रांचा कसा नाश केला याचें वर्णन करीत असतां महाभारतकार म्हणतात (द्रोणपर्व अ. १४६) :–

"अर्जुनानें अग्नीप्रमाणें तेजस्वी असा बाण धनुष्यावर योजतांच घाईघाईनें श्रीकृष्ण त्याला म्हणाले :– 'या दुरात्म्या सिंधुराजाचें मस्तक तूं तोड. मात्र माझ्या सूचनेकडे नीट लक्ष दे. याच्या जन्माच्या वेळीं ह्याच्या पित्याला आकाशवाणीनें असें सांगितलें आहे कीं, हा लढत असतां याच्या लक्षांत येणार नाहीं अशा पद्धतीनें शत्रू याचें मस्तक तोडील! तें ऐकतांच पुत्रप्रेमानें प्रेरित होऊन पित्यानें असा शाप देऊन ठेविलेला आहे कीं, जो कोणीं माझ्या पुत्राचें मस्तक तोडून जमिनीवर पाडील त्याचें स्वतःचें मस्तक फुटून त्याचे तुकडे होतील. हे पार्था, या स्यमंतपंचकाच्या बाहेरच ह्याचा पिता वृद्धक्षत्र तपश्चर्या करीत आहे. आपल्या दिव्य अस्त्राच्या प्रभावानें अशा पद्धतीनें तूं याचें मस्तक तोड कीं तें नेमकें त्याच्या मांडीवर जाऊन पडेल. अर्जुनाच्या गांडीव धनुष्यापासून आमिषावर झडप घालणाऱ्या ससाण्याप्रमाणें बाण सुटला व तो वेगानें सिंधुपति जयद्रथाचें मस्तक तोडून शत्रूंचा शोक वाढवीत व मित्रांचा आनंद फुलवीत आकाशमार्गानें तें मस्तक घेऊन चालला. जप करीत असलेल्या त्याच्या पित्याच्या अंकावर पुत्राचें मस्तक जाऊन पडलें. कल्पना नसतांना काय पडलें म्हणून उडालेल्या गोंधळांत तें त्याच्याच हातून जमिनीवर पडलें व शापाचा अर्थ शब्दशः खरा होऊन त्या

वृद्धक्षत्राचेंच मस्तक फुटून तो कालवश झाला. जयद्रथाच्या वधांतील ही प्रत्येक घटना जर लक्षपूर्वक पाहिली तर त्या वधाचें सर्व श्रेय एकट्या श्रीकृष्णांचें आहे ही गोष्ट उघडच दिसते. पण त्या संबंधांत अणुमात्रसुद्धां कांहींएक ध्वनित न करतां रणांगणावरून परतणाऱ्या पार्थाला श्रीकृष्ण काय म्हणत आहेत व कसें फुलवीत आहेत हें पाहाण्यासारखें आहे ( द्रोणपर्व अ. १४८ ) :–

"हे पार्था, इतकी विलक्षण प्रतिज्ञा करून ती तूं पूर्णपणें शेवटास नेलीस याविषयीं तुझें यश गावें तितकें थोडेंच आहे. सिंधुपति जयद्रथाला त्याच्या पित्यासहित नष्ट करणें ही सामान्य गोष्ट नव्हे. कौरवांच्या या प्रचंड सैन्याचा विस्तार व त्यांतील प्रबल योद्धयांचे पराक्रम यांच्या नुसत्या कल्पनेनें देवांनासुद्धां थरकांप सुटेल अशी वस्तुस्थिति आहे. केवळ एकट्या तुझ्यावांचून त्रैलोक्यांत दुसरा कोणीही या सैन्याशीं युद्ध करूं शकणारा मला दिसत नाहीं. येथें बळानें तुझ्यापेक्षां अधिक वाटावे अथवा समान वाटावे असे कितीतरी प्रभावशाली राजे दुर्योधनासाठीं उपस्थित आहेत. पण सुसज्ज होऊन ते केवळ तुझ्या अंगावर चालून आलेलेच आम्ही पाहूं शकलों. जे तुझ्या समोर उभे राहिले त्यांना पुन्हां आपल्या निवासस्थानाकडे जाण्याची संधीच तूं मिळूं दिली नाहींस. खरोखरीच पार्था, तुझा पराक्रम, तुझें बळ, महारुद्र अथवा महेंद्र यांच्याप्रमाणें आहे यांत शंका नाहीं. तूं एकट्यानें जें महत्कार्य पार पाडलें आहेस तसें दुसरें कोणीही पार पाडण्याची मुळींच शक्यता नाहीं. पहा, पहा, अर्जुना, अंतःकरणापासून जयाची इच्छा करणारे व ज्यांच्या कीर्तिदुंदुभीच्या नादानें दिक्कोन गर्जून उठावे असे मोठमोठे राजेलोक तुझ्या बाणाघातांनीं गतप्राण होऊन पडलेले आहेत. त्यांचीं छिन्नविच्छिन्न शरीरें पहा. भूमीला आलिंगन दिलेले, साऱ्या केसांत धूळ भरून गेलेले व तुझ्या बाणांनीं अवयवांचे ठिकठिकाणीं तुकडे उडालेले असे हे मोठमोठे योद्धे पहा. स्वतःच्या यशाचें वर्धन करणारें, समरांगणावरील हें महाकृत्य करण्याची शक्यता केवळ तुलाच आहे. एक तर दानवांना समरांगणांत ठार मारणारा महेंद्र व पृथ्वीवर नरव्याघ्र पार्थ यांच्याशिवाय तिसऱ्या

वीराचें नांवसुद्धां घ्यावयास नको." महाभारतकार पुढें म्हणतात ( द्रोणपर्व अध्याय १४८–५८ ) :—

"जणुं कांहीं येवढ्या बोलण्यानें मुळींच समाधान न झाल्यामुळें अर्जुनाला रणभूमि याप्रमाणें दाखवीत त्याच्या महान् विजयाचा सूचक म्हणून भगवान् श्रीकृष्णांनीं आपला पांचजन्य शंख ओठाला लावून त्याच्या नादानें वातावरण भारून टाकलें." शिबिरांत आल्यावर महान् ज्ञानसंपन्न युधिष्ठिरानें तें यश कोणाचें आहे हें पूर्णपणें ओळखलें होतें. म्हणून सद्‌गदित अंतःकरणानें श्रीकृष्णांचें स्तवन करावयास ते पुढें सरसावणार तोंच भगवान् श्रीकृष्ण त्यांना म्हणतात ( द्रोणपर्व अध्याय १४९–३७ ):—

"हे महाराज, तुमच्या भक्तीनें अंतःकरण व्यापल्यामुळें तुमचा बंधु असलेल्या या नरव्याघ्र अर्जुनानें सहस्रावधि योद्ध्यांना ठार मारून आज जयद्रथाचा वध केला आहे. कर्तृत्व, बाहुवीर्य, स्थिर-चित्तता, शीघ्रता, व अमोघ बुद्धिकौशल्य या दृष्टीनें अर्जुनाच्या योग्यतेचा पुरुष मी दुसरा कोणीही पाहिला नाहीं. हा तुमचा धाकटा बंधु आहे ही केवढी सद्‌भाग्याची गोष्ट आहे. अमित सैन्याचा नाश करून यानें आपली प्रतिज्ञा आज पूर्ण केलेली आहे." फार काय साऱ्या भारतीय युद्धाच्या विजयाचें श्रेय भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाच्या पदरीं बांधलें आहे. त्यांच्या या विलक्षण नेतृत्वावर सर्व अनुचरांचा प्रगाढ विश्वास असण्याचें हें एक महत्त्वाचें कारण होतें.

## आदर्श वल्लभ

भगवान् श्रीकृष्ण हे वल्लभ या नात्यानें अत्यंत आदर्श होते. अनंत स्त्रियांशीं त्यांना विवाह करावे लागले. त्यामुळें एका दृष्टीनें त्यांच्या कौटुंबिक जीवनांत घोर असंतोष सतत नांदावा. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, त्याऐवजीं श्रीकृष्णांवर त्यांच्या पत्नींचें इतकें विलक्षण प्रेम आहे कीं सतत त्यांची कृपा आपल्यावर व्हावी ही एकमात्र इच्छा त्यांच्या अंतःकरणांत नांदते. महाभारतांतील वनपर्वांत श्रीकृष्णांची पत्नी सत्यभामा व द्रौपदी यांचा एक संवाद

आलेला आहे. त्यांत सत्यभामेनें कोणाच्याही तावडींत न सांपडूं शकणाऱ्या मनोनिग्रही भगवान् श्रीकृष्णांना वश करून घेण्याचा उपाय विचारलेला आहे. श्रीमत् भागवतांत एका प्रसंगानें श्रीकृष्णांच्या सर्व स्त्रियांच्या साक्षीच दिलेल्या आहेत. त्या या दृष्टीनें मोठ्या उद्बोधक आहेत. एका सूर्यग्रहणाच्या वेळीं प्रभासक्षेत्रावर भारतांतील सर्व थोर लोक व राजे एकत्र आले होते. धार्मिक कृत्यें संपल्यावर त्यांतील सर्वजण आपआपल्या गटांत जाऊन सुखसंवाद करीत बसले असतां तेथील स्त्रियांचाही एक मोठा मेळावा अशाच सुखसंवादार्थ एकत्र जमला. अर्थातच त्यामध्यें पांडवस्त्रिया व यादवस्त्रिया एकत्र आल्या होत्या. चालू असलेल्या परिसंवादांत द्रौपदीनें श्रीकृष्णांच्या स्त्रियांना उद्देशून असें म्हटलें कीं, तुमचा भगवंताशीं विवाह कसा झाला याचें वृत्त आम्हांस सांगा. त्याबरोबर श्रीकृष्णांच्या सर्व स्त्रियांनीं आपआपल्या विवाहाचें वृत्त निवेदन केलें आहे. त्यांत प्रत्येक स्त्री शेवटीं जें म्हणते त्यावरून तिच्या अंतःकरणाची कृष्णविषयक भावना कळून येते. स्त्रिया सांगतात (भागवत दशमस्कंध अ. ८३) :–

“रुक्मिणी म्हणते, राजे लोक मला शिशुपालाला द्यावयाचें असें ठरवून व त्यासाठीं आपलीं धनुष्यें उचलून सिद्ध असतां श्रीकृष्णानें त्या अजिंक्य समजलेल्या योद्ध्यांच्या मस्तकावर पाय देऊन सिंह जसा मेंढ्यांच्या कळपांतून आपला भाग घेऊन जातो, त्याप्रमाणें मला हरण करून नेलें. लक्ष्मीचें निवासस्थान अशा त्या भगवंताच्या पायाचें माझ्या हातून नित्य पूजन घडो.

सत्यभामा म्हणते, माझा पिता जो सत्राजित त्याला आपल्या भावाच्या वधामुळें अत्यंत दुःख झालें. व त्या भावाबरोबरच स्यमंतक मणीही नष्ट झाल्यामुळें त्यानें त्या वधाचा व मण्याच्या चोरीचा आळ श्रीकृष्णांवर घातला, तेव्हां तो आरोप सर्वथा धुवून टाकावा म्हणून भगवंतानें ऋक्षराज जांबवानाचा पराभव करून त्याच्यापासून तो मणि आणला व माझ्या पित्याला दिला. एवंच खोटा आरोप केल्यामुळें आतां श्रीकृष्ण काय करील कोण जाणे

म्हणून माझ्या पित्याला संकोच उत्पन्न झाला व मण्यासह त्यानें मला प्रभु श्रीकृष्णाला अर्पण केलें.

जांबवंती म्हणते, माझा पिता जो जांबवान त्यानें श्रीकृष्ण म्हणजे आपला स्वामी जो सीतापति रामचंद्र तोच होय हें न ओळखल्यामुळें त्याच्याशीं २७ दिवस युद्ध केलें. शेवटीं युद्धांत जेव्हां त्याची परीक्षा झाली तेव्हां त्याला ओळख पटली व त्यानें मला श्रीकृष्णांना स्यमंतक मण्यासह अर्पण केलें. मी स्वत:ला त्यांची दासी समजते.

कालिंदी म्हणाली, श्रीकृष्णांच्या पादस्पर्शाचा लाभ घडावा या इच्छेनें मी तपश्चर्या करीत आहे असें जेव्हां त्या भगवंताला कळलें, तेव्हां अर्जुनासह येऊन त्यांनीं माझें पाणिग्रहण केलें व अशा रीतीनें मी त्यांची गृहदासी झालें.

भद्रा म्हणाली, माझ्या स्वयंवरांत येऊन व उपस्थित सर्व राजे लोकांचा पराभव करून स्वत:ची पत्नी म्हणविण्याचें सौभाग्य श्रीकृष्णांनीं मला प्राप्त करून दिलें. मला त्यांचे पाय धुण्याचें भाग्य जन्मोजन्मीं लाभो.

सत्या म्हणाली, माझ्या पित्यानें मला वरूं इच्छिणाऱ्या राजांची परीक्षा करण्याकरितां अत्यंत बलवान्, तापट आणि धार-दार शिंगांचे असे सात बैल सिद्ध केले. वीर्यशाली पुरुषांचा गर्व हरण करणाऱ्या भगवान् श्रीकृष्णांनीं त्या बैलांना, लहान मुलें खेळ-तांना लहान कोंकरांना जसें चटकन् धरतात त्याप्रमाणें धरून बांधून टाकलें. याप्रमाणें पराक्रम हेंच माझ्या प्राप्तीचें मोल ठेविलें असतां आपल्याला वाटेंत अडविणाऱ्या राजांचा पराभव करून आंदण दिलेल्या दासी आणि चतुरंग सेना यांसह श्रीकृष्ण मला घेऊन गेले. त्यांची सेवा मला नित्य घडो.

मित्रविंदा म्हणाली, हे द्रौपदी, श्रीकृष्ण हा माझा मामेभाऊ असून माझें मन त्याच्यावर प्रथमपासूनच आसक्त होतें. हें पाहून माझ्या पित्यानें आपण होऊन त्या भगवंताला बोलावून आणिलें आणि एक अक्षौहिणी सैन्य व अनेक दासी यांच्या सह मला त्यांच्या

पदरांत घातलें. मला त्यांच्या पादस्पर्शाचें भाग्य जन्मोजन्मीं लाभो. त्यानेंच माझें कल्याण होईल अशी माझी दृढ श्रद्धा आहे.

लक्ष्मणा नांवाच्या भगवंताच्या पत्नीनें आपल्या विवाहाची सर्व कथा सांगून शेवटीं ती म्हणाली कीं, आम्ही श्रीकृष्णांच्या दासी आहोंत. सर्व इच्छा सोडून त्यांच्या प्राप्तीसाठीं आम्ही पूर्वजन्मीं जें कांहीं तप केलें असेल त्याचेंच त्यांचा आम्हांस मिळणारा सहवास हें फळ होय अशी आमची दृढ श्रद्धा आहे.

नरकासुराच्या बंदीतून भगवंतांनीं सोडविलेल्या स्त्रियांनीं आपल्या विवाहाचें वृत्त सांगून शेवटीं आपल्या भावना व्यक्त करतांना म्हटलें: "हे पतिव्रते द्रौपदी, आम्हांला साम्राज्य, स्वराज्य, भोज्य, वैराज्य पारमेष्ठ्य, मोक्ष वा वैकुंठ यांपैकीं कशाचीही इच्छा नाहीं. लक्ष्मीच्या स्तनावरील केशराच्या सुवासानें सुगंधित झालेली गदाधारी श्रीकृष्णाच्या कांतियुक्त चरणावरील धूळ मस्तकीं धारण करावयास मिळावी याहून दुसरी कोणतीही इच्छा आम्हांला नाहीं." भगवान् श्रीकृष्णांच्या स्त्रियांच्या या विलक्षण उत्कट भावनांवरून त्यांच्या दांपत्यप्रेमाची कल्पना येऊं शकते. त्यांच्या सर्व स्त्रियांत अहंकारी फक्त सत्यभामा आहे. परोपरीनें श्रीकृष्णांच्या सेवेसाठीं त्यांच्या पत्नी कशा झटत याचें वर्णन करीत असतां श्रीमत् भागवतकार ( दशमस्कंध अ. ५९–४५ ) म्हणतात :

"त्यांच्यापाशीं प्रत्येकीं शेंकडो दासी असतांनाही त्या स्वतःच श्रीकृष्णांची सेवा करीत. स्वागत, आसन, पादप्रक्षालन, पादसंवाहन शृंगार, स्नान, भोजन, तांबूलदान, इत्यादि प्रत्येक गोष्ट स्वतः करावी म्हणून त्या झटत." भागवताच्या दशमस्कंधांत ( अ. ६० ) श्रीकृष्णांनीं रुक्मिणीची साधी थट्टा केली तर त्या थट्टेतील वियोगाच्या कल्पनेनें सुद्धां ती मूर्च्छा येऊन खालीं पडली असें वर्णन आहे. रुक्मिणी खालीं पडतांच श्रीकृष्णांच्या हृदयाची झालेली तगमग, त्यांनीं तिचें केलेलें सांत्वन व काढलेले उद्गार यांचें शब्दचित्र रेखाटतांना भागवतकार म्हणतात ( दशमस्कंध अ. ६०–२५ ते ३१ ):—

"आपण केलेल्या थट्टेचा खराच वियोग होणार असा अर्थ करून दु:खावेगानें रुक्मिणी मूर्च्छित झाली आहे हें पाहून श्रीकृष्णांनीं पर्यंकावरून खालीं उतरून तिला सावरलें. तिचे केस नीट केले. व आपल्या कमलासारख्या हातानें तिचे अश्रू पुसून त्यांनीं तिचें सांत्वन केलें. जवळ घेऊन ते रुक्मिणीला म्हणाले, उगाच तूं दु:ख केलेंस. तुझें माझ्यावर किती एकांतिक प्रेम आहे याची मला कल्पना नाहीं काय? पण तूं मला थट्टेंत उत्तर कसें देतेंस हें पहाण्यासाठीं मी तुझी थट्टा केली. पण रुक्मिणी, खरं सांगायचं तर नेहमींच प्रसन्न असणारा तुझा चेहरा आज गोंधळल्यामुळें अधिकच सुंदर दिसतो आहे. तुझे ओठ किती थरथरत आहेत. वक्रदृष्टीनें पाहिल्यामुळें तुझ्या डोळ्यांच्या कडा लाल होऊन भुवयांच्या धनुष्याकृति ओळी किती मनोरम दिसतात! मला तुला असें कधींही पहातां आलें नसतें. आणि रुक्मिणी, इतका हळवेपणा असूं नये. गृहस्थाश्रमी पुरुषांना घरांत राहण्याचा मोठा आनंदाचा काळ म्हणजे आपल्या प्रिय पत्नीशीं थट्टेचीं भाषणें करून जो घालवितां येईल तोच होय."

श्रीमत् भागवताच्या ६९ व्या अध्यायांत श्रीकृष्णांच्या संसारांतील असंतोष हुडकून काढण्याप्रीत्यर्थ आलेल्या नारदांना त्या संसाराच्या क्षीरसमुद्रांतील एकामागून एक पूर्ण समाधानाचे आवर्त पाहून कसें गोंधळल्यासारखें झालें व शेवटीं पूर्ण पुरुषाची गृहस्थ-जीवनांतील ही परिपूर्णता ध्यानांत घेऊन ते स्वत: त्यांना धन्यवाद देत कसे निघून गेले याचें अतिशय मनोरम वर्णन आहे.

भगवान् श्रीकृष्ण महान् विलासी होते असें त्यांच्या आनंदमय गृहजीवनावरून आढळून येईल. पण श्रीकृष्ण विलासी होते काय? हा एक खरोखरी विचारार्ह प्रश्न आहे. केवळ विलासासाठीं त्यांनीं सहस्त्रावधि स्त्रियांशीं विवाह केले असें त्यांच्या चरित्राच्या आक्षेपकांचें म्हणणें आहे. किंबहुना श्रीकृष्णांच्या विलासी जीवनाची मिठी प्रतिभेच्या मोठमोठ्या वैरागरांच्याही अंत:करणावर पडलेली आहे. कोणतेंही विलासी पद वा कविता श्लील-अश्लीलतेच्या वादांतून वांचवावयाची असली कीं तिच्यांत श्रीकृष्णांचा संबंध आणावयाचा ही युक्ति तर अलिकडेही पुष्कळ लोक अवलंबावयास लागलेले

आहेत. प्राचीन संस्कृत कवींच्या व मराठी कवींच्या शृंगार काव्यांचें तर श्रीकृष्ण नायकच आहेत, पण हें जर सगळें खरेंच असेल तर आपल्या अपार सामर्थ्याचा उपयोग सहस्रावधि स्त्रियांची आपल्या विलासभवनांत भरती करण्याकडे करून विलासवासनेच्या अग्नींत इतक्या स्त्रियांना ओढणारे श्रीकृष्ण महान् वासनाजयाची घोषणा करणाऱ्या भारताच्या सांस्कृतिक इतिहासांत पूर्णावतार म्हणून कधींच गणले जाणार नाहींत हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे. श्रीकृष्ण विलासी होते काय व नसतील तर त्यांच्या बहुपत्नीकत्वाचें कारण काय ?

भगवान् श्रीकृष्णांचे आक्षेपक त्यांच्याविषयीं विलासाच्या संबंधांत जें म्हणतात तें योग्य कीं अयोग्य हें पहाण्यापूर्वी आपण त्यांच्या विवाहांकडेच पाहूं. भगवान् श्रीकृष्णांच्या स्त्रियांमध्यें आठ स्त्रिया अष्टनायिका म्हणून विख्यात असून त्यांच्या आणखी सोळा सहस्र स्त्रिया होत्या असें वर्णन आढळतें. त्यांच्या अष्टनायिकांपैकीं रुक्मिणी, भद्रा, सत्या, मित्रविंदा व लक्ष्मणा या पांच राजकन्या असून कालिंदी, सत्यभामा, व जांबवन्ती ह्या तीन प्रत्यक्ष प्रथित राजघराण्यांतील नाहींत असें दिसतें. पांच राजकन्यांशीं भगवान् श्रीकृष्णांनीं विवाह करण्याचें कारण त्यांच्यासमोर कंसवधानंतर उपस्थित झालेल्या अखंड संघर्षांत दडलेलें आहे. राजकीय पुरुषांचे जे विवाह होत असतात त्यांचें प्रधान कारण हें राजकारणांतच दडलेलें असतें. श्रीकृष्णांना जर कोणत्याही प्रसंगीं पराक्रम गाजवून व आपलें कौशल्य प्रकट करून विवाह करण्याची खोड असती तर द्रौपदीच्या स्वयंवरांत तिची माळ श्रीकृष्ण सोडून दुसऱ्या कोणाच्याही गळ्यांत पडण्याचा मुळींच संभव नव्हता. धनुर्विद्येच्या कलेंत श्रीकृष्ण हे पार्थापेक्षांही अधिक कुशल होते याचा मी इतरत्र उल्लेख केलाच आहे. अशा स्थितींत द्रौपदीच्या स्वयंवरांतील मत्स्यापेक्षांही अधिक विकट मत्स्य तोडून खालीं पाडणाऱ्या श्रीकृष्णांना द्रुपदाच्या मत्स्ययंत्राचा भेद करणें मुळींच अवघड नव्हतें. द्रौपदी ही कशी अत्यंत लावण्यवती होती व तिच्या प्राप्तीसाठीं मोठमोठ्या राजघराण्यांतील कुलंधर व तरुण पराक्रमी

लोकांत कशी स्पर्धा लागून राहिली होती हें माझ्या महाभारता-वरील व्याख्यानें या ग्रंथांतील द्रौपदीच्या स्वभावरेखनांत मी मांडलेलें आहे. पण श्रीकृष्णांनीं त्या स्पर्धेत सर्व क्षत्रिय अयशस्वी व भग्नोत्साह झाले असतांनाही मुळींच भाग घेतला नाहीं. त्यांना विचारण्यांतही आलें; पण त्यांनीं ती गोष्ट नाकारली व केवळ प्रेक्षक म्हणून ते तेथें उपस्थित राहिले. तात्पर्य, केवळ विवाहाच्या इच्छेपेक्षां त्यांच्या विवाहाला दुसरींच कारणें संभवतात.

त्यांच्या अष्टनायिकांपैकीं पांच राजकन्यांशीं त्यांनीं जे विवाह केले ते केवळ वेगवेगळचा राजघराण्यांशीं आपले संबंध प्रस्थापित करून जरासंधाच्या नेतृत्वाखालीं एकवटलेल्या राजसंघाशीं कराव्या लागणाऱ्या संघर्षांत आपण एकटेच पडूं नये तर आपल्यालाही साहाय्यक असावेत म्हणून केलेले आहेत. दुर्दैवानें इतर सर्व व्यवहारांत या संबद्ध राजघराण्यांचा व त्यांचा संबंध अतिशय चांगला असला तरी प्रत्यक्ष जरासंधाशीं असणाऱ्या संघर्षांत मात्र त्याच्या धाकामुळें त्यांचा त्यांना फारसा उपयोग झाला नाहीं असें स्वतः श्रीकृष्णांच्याच बोलण्यावरून दिसतें. युधिष्ठिराशीं राजसूय यज्ञासंबंधीं वाटाघाटी करीत असतां ते जरासंधाच्या सामर्थ्याचें वर्णन करून सांगतांना (सभापर्व अ. १४–२२व२३) म्हणतात :—

"ज्याचा भाऊ भगवान् परशुरामाप्रमाणें अत्यंत बलवान् तो आमचा सासरा राजा भीष्मक (म्हणजे रुक्मिणीचे वडील) हाही जरासंधाच्याच सेवेंत आहे. नेहमीं त्याचें प्रिय करण्यासाठीं झटणाऱ्या, व सदैव नम्रतेनें वागणाऱ्या, आमच्यासारख्या अत्यंत जवळच्या नातलगांचेंही नातें विसरून तो आमच्या शत्रुपक्षांत समाविष्ट झालेला आहे. त्याचा व आमचा नातेंसंबंधही विसरून शत्रुपक्षाकडून तो आमचें अप्रिय करण्याविषयीं झटत असतो."

राजा जरासंधाचें असलेलें विलक्षण सामर्थ्य आणि त्याचा क्रूर स्वभाव या दोन गोष्टींमुळें या संबंधांचा श्रीकृष्णांना जितका उप-योग होणें आवश्यक होतें तितका जरी झालेला नसला तरी मुळांत हे संबंध उत्पन्न करतांना ते मुख्यतः राजकीय हेतूस्तवच उत्पन्न करण्यांत आलेले आहेत. अष्टनायिकांपैकीं तीन या वेगवेगळ्या

कारणास्तव त्यांच्याकडे चालून आलेल्या आहेत. सत्यभामेशीं त्यांचा झालेला विवाह स्यमंतक मण्याच्या प्रकरणांतून स्वतःची सुटका करून घेण्यासाठीं स्वतः तिच्या पित्यानें, सत्राजितानें, आपण लोकांतून सदाचें उठून जाऊं नये म्हणून एकांतांत येऊन श्रीकृष्णांची विनवणी केल्यामुळें केलेला विवाह आहे. श्रीमत् भागवतकार या विवाहासंबंधीं लिहितात ( दशमस्कंध अ. ५६–३८ ते ४३ ) :–

" स्यमंतक मण्याच्या विषयांत तो कपटानें लांबविला अशी आपली अकारण दुष्कीर्ति पसरविणाऱ्या सत्राजिताला भर सभेंत बोलावून त्याच्या स्वाधीन श्रीकृष्णांनीं तो मणि केला व सर्वसमक्ष त्याचे दांत घशांत घातले. त्यामुळें तो अतिशय लज्जित झाला. त्याला तोंड दाखविणें अशक्य झालें. खालीं मान घालून तेथून तो आपल्या घरीं निघून गेला. थोर पुरुषाचा अकारण द्वेष केल्यामुळें तो अगदीं घाबरून गेला आणि कृतापराधाविषयीं मनाशीं विचार करूं लागला. हें पाप मी आतां कसें धुऊन काढूं ? माझ्यावर श्रीकृष्ण कसा प्रसन्न होईल ? मी काय केलें असतां माझें कल्याण होईल आणि लोक माझी अदूरदर्शी, क्षुद्र, मूर्ख व द्रव्यलोभी या शेलक्या विशेषणांनीं निंदा करणार नाहींत ? तरी आतां आपण आपली अत्यंत सुंदर अशी कन्या सत्यभामा श्रीकृष्णाला अर्पण करावी व तिच्याबरोबर आंदण म्हणून हा मणीही द्यावा असें त्यानें आपल्या मनाशीं ठरविलें व स्वतः होऊन त्यानें मणि व कन्या श्रीकृष्णांना दिली. श्रीकृष्णांनीं मणि घेतला नाहींच. नुसता मणि श्रीकृष्ण घेणार नाहींत व मणि त्यांच्या स्वाधीन न केला तर आपल्याच अपराधामुळें घोर लोकद्वेषास तोंड द्यावें लागणार ही आपली परिस्थिति सत्राजितानें श्रीकृष्णांना निवेदन केली व म्हणून त्यांनीं सत्यभामेचा स्वीकार केला आहे.

या स्यमंतकासाठीं जांबवंताशीं त्यांना जें विलक्षण युद्ध करावें लागलें त्याचा उल्लेख मीं मागें केलाच आहे. आपण मिळविलेला मणि नुसता न देतां मुलीबरोबर जावयाला द्यावयाची देणगी म्हणून देण्याची त्याची सिद्धता होती व श्रीकृष्णांना कांहींही करून मणि नेण्याची निकड असल्यामुळें भांडण व त्यांतून उत्पन्न होणारा

कडवटपणा याऐवजीं सामोपचारानें व सदाची मैत्री जोडून तो मिळत असल्यामुळें तसा स्वीकारणें हा अर्थातच उत्कृष्ट मार्ग होता. म्हणून श्रीकृष्णांना हा विवाह पत्करावा लागला. कालिंदीचा त्यांच्याशीं झालेला विवाह हा मात्र तिच्या एकांतिक प्रेमाचाच केवळ विजय आहे. तत्कालीन समाजांत बहुपत्नीकत्व हें निषिद्ध वा निंद्य तर नव्हतेंच, पण चांगलेंच रूढ असून ती कांहीं अमान्य वा विशेष विचार करण्यासारखी गोष्ट नव्हती. श्रीकृष्णांनीं एकपत्नीकत्वाचें कोणतेंही व्रत घेतलेलें नव्हतें. त्यामुळें तत्कालीन सामाजिक रूढीच्या अनुरूप व राजकीय वा अन्य कारणास्तव श्रीकृष्णांनीं हे आठ विवाह केले असल्याचें दिसून येतें. छत्रपति श्रीशिवाजी महाराजांनीं आठ विवाह केले असल्याचें इतिहासांत उल्लेखिलेलें आहे. ज्या काळांत श्रीकृष्ण झाले त्या काळांतही कोणत्याही प्रसिद्ध पुरुषाचे एकाहून अधिक विवाह झालेले आहेत. लोकसंकेताला योग्य, धर्मशास्त्राला मान्य, व परिस्थितीला आवश्यक अशी या आठ विवाहांची वस्तुस्थिति आहे. पण खरें सांगावयाचें तर श्रीकृष्णांनीं हे आठ विवाह केले असते तर त्यांचे विवाह हा चर्चेचा प्रश्न होत नव्हता. तो तसा होण्याचें खरें कारण यानंतर त्यांनीं शतावधि राजस्त्रियांशीं जे विवाह केले त्यांत दडलेलें आहे. शतावधि स्त्रियांशीं श्रीकृष्णांनीं विवाह कां केले असतील ?

## एक घोर सामाजिक संकट

श्रीकृष्णांनीं ज्यांच्याशीं विवाह केले त्या या सर्व स्त्रिया कुलीन राजे व सामंत यांच्या घराण्यांतील असून प्राग्ज्योतिष प्रांताचा राजा ‘नरकासुर’ याच्या बंदींतून सोडविलेल्या आहेत. नरक हा अत्यंत अत्याचारी व बलाढ्य असुर असून आपल्या मुर नांवाच्या मित्राच्या साहाय्यानें स्त्रियांचें अपहरण करून त्यांना नाडणें, व त्यांचा व्यापार करणें हा त्याचा धंदा होता. स्त्रीचारित्र्यावरील तो एक महान् आपत्ति असून नरकासुराच्या या भयानक अपकृत्याच्या विविध वार्ता द्वारकेंत स्थिरपद झाल्यापासून भगवान् श्रीकृष्णांच्या

कानीं एकसारख्या येत होत्या. पशुत्व जेथें मानवतेवर अत्याचारास प्रवृत्त होईल त्या प्रत्येक ठिकाणीं जाऊन त्याचें निखंदन करणें व तें करीत असतां अंतःकरणाची वृत्ति निरभिलाष राखणें हें भगवान् श्रीकृष्णांचें महाव्रत कंसाला मारल्यापासूनच सर्वत्र विख्यात झालेलें होतें. अशा स्थितींत प्रत्येक दलित व्यक्ति वा समाज आपला बंधमोचक म्हणून त्यांच्याकडे पहात असे. त्यांनीं नरकासुराच्या जाचांतून दलितांची मुक्तता करावी म्हणून अनेकांनीं त्यांची प्रार्थना केली व नरकासुराचीं दुष्ट कृत्यें ऐकून त्याचा वध करावयाचा निर्णय श्रीकृष्णांनीं घेतला. स्त्रीजातींवरील त्याच्या महान् संकटाचें वर्णन करतांना हरिवंशांत असें म्हटलें आहे कीं :

**गन्धर्वाणां च याः कन्या जहार नरको बली ।**
**याश्च देवमनुष्याणां सप्त चाप्सरसां गणाः ॥ १२**
**चतुर्दश सहस्राणि एकविंशच्छतानि च ।**
**एकवेणीधराः सर्वाः सतीमार्गमनुव्रताः ॥ १३**

--(हरिवंश, विष्णुपर्व अ. ६३)

"अनेकविध घराण्यांतून नरकासुरानें अनेक स्त्रिया पळविल्या. त्या सर्व कुमारिका होत्या. त्यांची संख्या सहस्रांनीं भरणारी होती. श्रीकृष्णांनीं त्याच्या याच घोर अपराधास्तव प्राग्ज्योतिष पुरावर हल्ला चढवून त्याला ठार मारलें. त्यांनीं एकट्या नरकासुरालाच मारलें नाहीं तर मुर, पंचजन इत्यादि त्याच्या सर्व साथीदारांसह त्यांनीं त्याचा वध केला. एका द्रौपदीच्या अपमानासाठीं संपूर्ण कौरववंशाला आपल्या क्रोधाग्नींत दग्ध करून टाकणाऱ्या श्रीकृष्णांना अशा अनंत द्रौपदींचा शीलविध्वंस करावयास पद्धतशीरपणें प्रवृत्त झालेल्या लोकांविषयीं केवढा विलक्षण संताप असेल हें कांहीं वेगळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. श्रीकृष्णांनीं नरकासुराला ठार मारल्यावर त्यांनीं त्याच्या अंतःपुरांत प्रवेश केला. तेथें शोध करतां करतां खास गुहेंत क्रूर पहारेकऱ्यांच्या पहाऱ्याखालीं असलेल्या स्त्रियांचा त्यांना पत्ता लागला. त्या सर्वांनीं काषायवस्त्रें परिधान केलीं होतीं. ज्या नरकांतून कधींही बाहेर पडण्याची आशा त्यांनीं केली नव्हती त्यांतून सोडविणारा आपला

बंधमोचक आल्याचें पहातांच त्यांच्या अंतःकरणाला केवढा आनंद झाला असेल ! हरिवंशकार ( विष्णुपर्व अ. ६४) म्हणतात :

" भगवान् श्रीकृष्णांनीं त्या गुहेंत असलेल्या मुली पाहिल्या, त्या काषायवस्त्रें परिधान केलेल्या होत्या. नरकासुरानें त्यांना पकडून आणतांना जी वेणी त्यांनीं घातली होती ती जशीच्या तशीच होती. आपली सुटका व्हावी म्हणून व्रतें, उपवास करून त्या अत्यंत कृश झालेल्या होत्या. आपले अपहारक, आपल्या लावण्यधनावर दरोडा पाडावयास उत्सुकलेले नरक, मुर, हयग्रीव व निसुंद यांना भगवान् श्रीकृष्णानें ठार मारलें व या दानव राज्याचें निखंदन केलें हें ऐकतांच आपल्या त्या बंधमोचकाच्या वाटेकडे त्या डोळ्यांत प्राण आणून वाट बघत होत्या. श्रीकृष्णांनीं त्या जागीं प्रवेश करतांच त्या कमलनेत्र भगवंतांनीं आपलें संरक्षण केलें असल्यामुळें आपलें जीवनसर्वस्व त्यांनाच अर्पण करावें अशी त्यांची मनोधारणा झाली. पत्नी म्हणून त्यांनीं आपला स्वीकार करावा असें त्यांना उत्कटतेनें वाटूं लागलें. चंद्रवदन श्रीकृष्णांच्या सभोंवती उभे राहून त्या म्हणूं लागल्या : 'आम्हांला पूर्वींच मोठमोठ्या ऋषींनीं असें सांगितलें आहे कीं नरकाला ठार मारणारा भगवानच तुमचा पति होईल. तेव्हां-पासून आम्ही आपल्या वाटेकडे डोळे लावून होतों. आपली कीर्ति आम्ही यापूर्वींच ऐकलेली आहे. आज आपल्या दर्शनानें आम्ही कृतार्थ झालों. आपलें जीवितसर्वस्व आम्हीं आपणांसच अर्पण केलें आहे. आपणाविना आम्हांस दुसरी गति नाहीं.' त्यांचे ते करुण विलाप ऐकून भगवान् श्रीकृष्णांनीं त्या मुलींचें सांत्वन केलें, त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुरूप त्यांचा सन्मान केला व त्यांच्याशीं बोलून शिबिकांमधून द्वारकेकडे त्यांना पाठवून दिलें. "

या वर्णनांतील दैवी भाग सोडून देऊन केवळ मानवी भागाकडे वळलें तर प्रत्यक्षांत काय दृष्टोत्पत्तीस येतें ? नरकासुर व प्राग्ज्योतिषपुर या दोन्हींही ऐतिहासिक घटना आहेत ही गोष्ट निर्विवाद आहे. या नरकासुराचाच पुत्र म्हणजे कुरुपांडव युद्धांत अर्जुनानें ठार मारलेला राजा भगदत्त होय. नरकासुर–भगदत्ता-पासून आपली परंपरा सांगणारा त्यांच्या वंशांतील राजांचा एक

गुप्तकालीन ताम्रपट नुकताच प्रसिद्ध झाला आहे. तात्पर्य,नरकासुर ह्या एक ऐतिहासिक पुरुष होता व आपल्या आसुरी प्रवृत्तीच्या अनुरूप रावणादि असुरांच्या पावलावर पाऊल टाकून स्त्रीलावण्याचा तो एक भयानक दरोडेखोर बनून राहिला होता. भगवान् श्रीकृष्णांनीं त्याला ठार मारलें. त्याच्या बंदींतील ज्या मुलींना त्यांनीं सोडविलें, त्यांच्या शतावधि संख्येकडे पाहिलें तर तो स्त्रीविक्रयाचा व्यापारही करीत असला पाहिजे असें म्हणतां येईल. पण तो विक्रय करो अथवा न करो, शतावधि चांगल्या घराण्यांतील मुली त्याच्या बंदीखान्यांत होत्या ही गोष्ट निर्विवाद आहे. श्रीकृष्णांनीं त्याला ठार मारून त्या मुलींना सोडविलें. पण मुलींना सोडविल्या-नंतर एक वेगळाच महत्त्वाचा प्रश्न त्यांच्यासमोर उभा राहिला. तो प्रश्न म्हणजे त्या मुलींचें करावयाचें काय हा होय.

दुष्ट आक्रमकाच्या तावडींतून चांगल्या घराण्यांतील मुलींची सुटका करणाऱ्या सामाजिक कार्यकर्त्यांसमोर आजच्या विसाव्या शतकांतही पुढें त्यांचें काय करावयाचें हा प्रश्न उभा राहिल्या-विना राहात नाहीं. सामाजिक परिस्थितींत विशिष्ट रूढ संकेतामुळें त्यांच्या मूळ पालकांची त्यांना स्वतःच्या कुटुंबांत समाविष्ट करून घेण्याची सिद्धता नसते. आईबापांनीं त्या मुलींना हृदयावर दगड ठेवून आश्रय दिला तरी त्यांच्या पुढच्या जीवनाचें काय हा मोठाच प्रश्न उभा राहतो व त्याचें उत्तर न मिळतां तें प्रश्नचिन्ह नुसतेंच वाढत राहातें. जणू कांहीं एकाद्या सबळ लांडग्यानें त्यांना पळविलें हा त्या मुलींचा अपराधच आहे! या स्थितींत कोणीही मनुष्य त्यांना सहसा पत्नी म्हणून पत्करावयास तयार होत नसल्यामुळें त्यांच्यासमोर केवळ दोनच मार्ग शिल्लक उरतात. ते दोन मार्ग म्हणजे एक आत्महत्या किंवा दुसरा म्हणजे वेश्याव्यवसाय. आजही पळवि-लेल्या हिंदू मुली, अपहार करणाऱ्या व्यक्तीच्या सहवासांत आपलें नरकमय जीवन जन्मभर घालवावयास ज्या सिद्ध होतात त्यांतली पुष्कळशी वस्तुस्थिति त्यांच्या मूळच्या समाजांत त्यांना प्रतिष्ठेचें व सन्मानाचें जीवन जगणें अशक्य होऊन बसण्यांतच दडलेली असते. नरकासुराच्या बंदींतील या कुमारिकांच्या जीवनाचाही असाच

बिकट प्रश्न उत्पन्न झालेला आहे. तो लक्षांत घेऊन मानवतेचे महान् उद्धारक भगवान् श्रीकृष्ण हे स्वतः पुढें आले व जसे सुटकेचे, तसेंच त्या चांगल्या घराण्यांतील मुलींच्या जीवनाची घडी नीट बसवून त्यांना प्रतिष्ठेचें व सन्मानाचें जीवन सामाजिक क्षेत्रांत मिळवून देण्याचें उत्तरदायित्वही आपलेंच आहे हें त्यांनीं ओळखलें. इतर कोणीही जी गोष्ट करावयास सहसा सिद्ध व्हावयाचें नाहीं ती त्यांनीं स्वतःच्या विभूतिमत्त्वानुरूप केली. त्यांनीं त्या कुमारिकांची इच्छा ओळखून पत्नी म्हणून त्यांचा स्वीकार केला. श्रीकृष्णांनीं स्वतःच त्यांचा स्वीकार केल्यावर आपोआपच सामाजिक जीवनांतील त्यांचें स्थान निश्चित झालें. भगवंतांच्या या लोकोत्तर सामाजिक कार्याला जर विलास म्हणावयाचें असलें तर तशा महापुरुषांना 'ते के न जानीमहे' एवढें एकच उत्तर असूं शकेल !

भगवान् श्रीकृष्ण हे द्वारकेच्या वैभवसंपन्न राज्याचे सूत्रधार होते. कामसंकल्पवर्जित अशा त्यांच्या सम अंतःकरणप्रवृत्तीचीं किती तरी वर्णनें आढळतात. आनंदमय गृहस्थाश्रम करूनही जलाशयांतील कमलपत्राप्रमाणें त्यांच्या अंतःकरणाला आसक्तीचा लेप कधींही लागला नाहीं. श्रीकृष्णांना आपल्या स्वाधीन करून घेणें अशक्य आहे हें त्यांच्या पत्नींना कसें पटलें होतें याची साक्ष महाभारतांतील सत्यभामा–द्रौपदीच्या संवादावरून मिळते. भागवतकार (दशमस्कन्ध अ. ६१–३ व ४) त्यांच्या निर्लेप व अनासक्त मनःस्थितीचें वर्णन करतांना म्हणतातः

"भगवान् श्रीकृष्णांचें कमलासारखे सुंदर मुख, त्यांचे आजानुबाहू, पाणीदार डोळे, प्रेमळ हंसणें, सहानुभूतीनें पहाणें, गोड बोलणें, इत्यादि गोष्टींनीं त्या स्वतः अगदीं मोहून गेल्या होत्या. पण त्या स्त्रियांना आपल्या अनेक प्रकारच्या विलासांनीं सुद्धां परिपूर्णस्वरूपी श्रीकृष्णांचें मन हरण करतां आलें नाहीं. स्मित हास्य करीत त्यांच्याकडे पाहून आपल्या मनांतील अभिप्राय त्यांना दर्शविणें, कटाक्षपात इत्यादि अनेक विभ्रमानें देखील श्रीकृष्णांना स्वाधीन करून घेणें अशक्य आहे असें त्यांना वाटे. पण निर्लेप पुरुषानें एकदां संसाराचा स्वीकार केल्यावर त्यांतील प्रत्येक

अवस्थेंत सहवासांतील दुसऱ्या व्यक्तींचें जीवन खुरटें न करतां तें अधिकांत अधिक फुलविणें हेंच त्या व्यक्तीच्या परिपूर्णतेचें खरें लक्षण आहे. अनासक्त पुरुषानें एकदां संसार पत्करल्यावर त्याला अभिनिवेशाचीं लक्षणें पत्करावीं लागतातच. तीं न पत्करणें हीच खरी अपूर्णता होय. अंत:करण पूर्णपणें ब्राह्मी स्थितीशीं एकरूप झालेले नवभारताचे ब्रह्मर्षि श्री. आण्णासाहेब पटवर्धन हे महालक्ष्मीच्या दिवशीं देवीजवळील पदार्थांत साधी कांकडी नसली तर अस्वस्थ होऊन जात व दसऱ्याच्या दिवशीं द्यावयाचें पोस्त कधींही स्वत:च्या हातानें न देतां दुरूनच आश्रितांच्या अंगावर फेंकीत. या विशिष्ट वागणुकींतील जें रहस्य, तेंच भगवान् श्रीकृष्णांच्या वैभवशाली गृहजीवनांतील रहस्य होय. परिपूर्ण सिद्ध पुरुषाच्या व्यवहारांतील अवस्थेंतही साधकाच्या अपरिपूर्णतेची झांक दिसावी अशी अपेक्षा करणें चूक आहे. असो.

## श्रीकृष्णांचा इंद्रियजय

श्रीकृष्णांच्या नेतृत्वाचा आणखी एक विशेष म्हणजे भगवान् श्रीकृष्णांचा इंद्रियजय होय. इंद्रियजय ही केवळ आध्यात्मिक अवस्थेंतील साधनसंपत्ति आहे हा समज अत्यंत चुकीचा आहे. चाणक्याच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या राज्यशास्त्रावरील सूत्रांत पुढील दोन सूत्रें विचारार्ह आहेत :–

'राज्यमूलं इंद्रियजय:' व 'जितात्मा सर्वार्थै: संयुज्येत' हीं तीं दोन सूत्रें होत. चाणक्य म्हणतो कीं, राज्यप्राप्तीचें मूळ इंद्रियजय असून मनोनिग्रही मनुष्याला सर्व अर्थ प्राप्त होतात. चाणक्य सूत्रें हीं स्वत: चाणक्यानें लिहिलीं आहेत किंवा नाहींत याविषयीं अनेकांचा मतभेद आहे. म्हणून कौटिल्यानें स्वत: केवळ राज्यशास्त्र म्हणूनच लिहिलेला जो महान् ग्रंथ व ज्याच्या कर्तृत्वासंबंधीं कोणत्याही प्रकारचा वाद नाहीं त्यांतीलच एक उतारा अत्यंत उद्बोधक म्हणून मी येथें देतो:–

**इंद्रियजयः**

**विद्याविनयहेतुरिन्द्रियजयः कामक्रोधलोभमानमदहर्षत्यागात्कार्यः। कर्णत्वगक्षिजिह्वाघ्राणेन्द्रियाणां शब्दस्पर्शरूपरसगन्धेष्वविप्रतिपत्तिरिन्द्रियजयः। शास्त्रार्थानुष्ठानं वा। कृत्स्नं हि शास्त्रमिदमिन्द्रियजयः। तद्विरुद्धवृत्तिरवश्येन्द्रियश्चातुरन्तोऽपि राजा सद्यो विनश्यति-यथा दाण्डक्यो नाम भोजः कामात् ब्राह्मणकन्यामभिमन्यमानस्सबन्धुराष्ट्रो विननाश। करालश्च वैदेहः। कोपाज्जनमेजयो ब्राह्मणेषु विक्रान्तः तालजङ्घश्च भृगुषु। लोभादैलश्चातुर्वर्ण्यमत्याहारयमाणः, सौवीरश्चाजबिंदुः। मानात् रावणः परादारानप्रयच्छन्, दुर्योधनो राज्यादंशं च। मदाद्दम्भोद्भवो भूतावमानी हैहयश्चार्जुनः। हर्षाद्वातापिरगस्त्यमत्यासादयन्, वृष्णिसङ्घश्च द्वैपायनमिति। एते चान्ये च बहवः शत्रुषड्वर्गमाश्रिताः। सबन्धुराष्ट्रा राजानो विनेशुरजितेन्द्रियाः॥ शत्रुषड्वर्गमुत्सृज्य जामदग्न्यो जितेन्द्रियः। अम्बरीषश्च नाभागो बुभुजाते चिरं महीम्॥ इति विनयाधिकारिके इन्द्रियजये अरिषड्वर्गत्यागः षष्ठोऽध्यायः। तस्मादरिषड्वर्गत्यागेनेन्द्रियजयं कुर्वीत।** (कौटिलीय अर्थशास्त्र पृ. ४)

"इंद्रियजयापासून विद्या व विनय हे प्राप्त होतात. म्हणून काम, क्रोध, लोभ, मान, मद व हर्ष यांचा त्याग करून इंद्रियजय साधावा. कान, त्वचा, डोळे, जिव्हा व नाक इत्यादि इंद्रियांना अनुक्रमें शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध यांचें ज्ञान न होणें किंवा त्यांचें शास्त्रार्थाला अनुसरून सेवन करणें याला इंद्रियजय म्हणतात. ज्याचीं इंद्रियें स्वाधीन नाहींत व जो शास्त्राविरुद्ध वर्तन करतो तो राजा समुद्रवलयांकित पृथ्वीचा राजा असला तरी तत्काल नाश पावतो. उदाहरणार्थ भोजकुलांतील दांडक्य नांवाचा राजा कामवश होऊन ब्राह्मण कन्येचा अभिलाष करूं लागल्यामुळें बांधवांसह राज्यभ्रष्ट झाला. वैदेह कुलांतील करालाची तशीच कथा आहे. जनमेजय राजा कोपवश होऊन ब्राह्मणाशीं अमर्यादेनें वागू

लागतांच नाश पावला. तालजंघानें भृगूशीं तसेंच वर्तन केलें व त्याचाही तोच परिणाम झाला. ऐल ( पुरूरवा ) राजा लोभामुळें चारी वर्णांकडून द्रव्य उकळूं लागल्यामुळें नष्ट झाला. तीच गति सौवीरदेशचा राजा अर्जबिंदु याची झाली. रावणानें गर्वामुळें परस्त्री परत दिली नाहीं व दुर्योधनानें भावांचा वांटा दिला नाहीं यामुळें ते दोघे नाश पावले. मदोन्मत्तपणानें सर्व प्राण्यांचा अपमान केल्या-मुळें दंभोद्भव व हैहय कुलांतला सहस्रार्जुन यांची इतिश्री झाली. अगस्ति ऋषीला फसवूं पहाणारा वातापी आणि द्वैपायनाची परीक्षा पहाणारा यादववंश याचा शेवट हर्षातिरेकामुळें झाला. याप्रमाणें इतर अनेक राजे आत्मसंयमन न करतां कामक्रोधादि षड्रिपूंच्या स्वाधीन झाल्यानें कुल व राष्ट्र यांसह नाश पावले. षड्रिपूंचा त्याग करून जितेंद्रिय बनलेले जामदग्न्य व नभगसुत अंबरीष यांनीं पृथ्वीचा चिरकाल उपभोग घेतला. राजर्षीनें षड्रिपूंचा त्याग करून जितेंद्रिय व्हावें."

इंद्रियजयाचें हें राजनीति शास्त्रांतील विवेचन इंद्रियजय हा अध्यात्मनिष्ठेलाच केवळ नव्हे, तर महान् स्वरूपाच्या राजकीय व सामाजिक नेतृत्वालाही केवढा आवश्यक आहे हें पटवून देईल.

## मनोविजय व भगवान श्रीकृष्ण

भगवान् श्रीकृष्ण हे मानवी मनोविकारांच्या इतके अधीन आहेत कीं, हवेंतसें ते त्या मनोविकारांना त्या त्या विशिष्ट परि-स्थितींत साधन म्हणून वापरूं शकतात. सभापर्वांतील शिशुपाल वधाचें प्रकरण हें त्यांच्या क्रोध या मनोविकाराच्या इच्छेनुरूप वापराचें एक अत्यंत उत्कृष्ट उदाहरण म्हणून सांगतां येण्यासारखें आहे. चेदिपति शिशुपाल हा श्रीकृष्णांचा आतेभाऊ. भगवान् श्रीकृष्णांनीं त्याच्या आईजवळ त्याचे शंभर अपराध पोटांत घालण्याचें अभिवचन दिलें होतें. त्या अभिवचनांत सांपडल्यामुळें श्रीकृष्णांनीं अंगीं सर्व प्रकारचें सामर्थ्य असूनही त्याला केवळ क्षमाच केली. श्रीकृष्णांनीं युधिष्ठिराच्या राजसभेंत शिशुपालाच्या तोंडावर त्याचे उच्चारून दाखविलेले अपराध इतके भयानक आहेत कीं

त्यांतील कोणत्याही एका अपराधासाठीं त्यांनीं त्याला सहज ठार मारलें असतें. शिशुपालाच्या या अपराधांचें परिगणन करतांना (सभापर्व अ. ४५–६ ते १३) श्रीकृष्ण सांगतात:–

"हे राजे लोकहो, कांहींही अपराध न करणाऱ्या आम्हां यादवांचा हा क्रूरकर्मा शिशुपाल अत्यंत मोठा शत्रु आहे. हा वस्तुतः आमच्या आत्याबाईंचा मुलगा. पण याचा एकेक अपराध मी सांगितला तर तुमच्या अंगावर रोमांच आल्याविना राहणार नाहींत. आम्हीं प्राग्ज्योतिषपुराला गेलों असतां मी द्वारकेंत नाहीं असें पाहून यानें द्वारकेला आग लावून दिली. भोजपति उग्रसेन हा रैवतक पर्वतावर विहार करावयास गेला असतां त्याच्या परिवारावर यानें चोरटा हल्ला करून, अनेक निरपराध लोकांना अकारण ठार मारून व कित्येकांना बंदी करून हा त्यांना घेऊन गेलेला आहे. माझ्या वडिलांनीं अश्वमेध यज्ञ केला असतां ह्या पाप्यानें त्या यज्ञाचा घोडा पळविला. हस्तिनापुराहून सौवीरप्रांतांत अक्रूराची बायको गेली असतां ह्यानें त्या पतिव्रतेला पळविलें. करुष प्रांताच्या राजाला याची मामेबहीण भद्रा द्यावयाचें ठरलें असतां कपटवेष धारण करून ह्या नृशंसानें स्वतःच तिला पळविलें. ह्याचीं हीं संपूर्ण अपकृत्यें केवळ आत्याबाईंना दिलेल्या वचनाप्रीत्यर्थ मीं सहन केलीं आहेत. हा आमचें किती भयानक शत्रुत्व करतो हें याच्या आतांच्या वर्तनावरून आपणा सर्वांच्या ध्यानांत आलेंच आहे. याचीं जीं अपकृत्यें तुम्हांला माहीत नाहींत तीं केवळ मी सांगितलीं."

शिशुपालाचें यांपैकीं प्रत्येक अपकृत्य असें आहे कीं ज्यासाठीं श्रीकृष्णांनीं केव्हांच त्याला ठार मारलें असतें. पण तीं सारीं अपकृत्यें तर त्यांनीं सहन केलींच; पण युधिष्ठिराच्या सभेंतसुद्धां तो हवें तें बोलत असतां नि अनन्वित शिवीगाळ करीत असतां श्रीकृष्ण त्याला कांहींही बोलले नाहींत. सभेंतील शिशुपालाचें वर्तन व तो बोलत असलेली भाषा किती भयानक स्वरूपाची आहे हें ध्यानांत घेतलें म्हणजे श्रीकृष्णांच्या शांततेचें नवल वाटूं लागतें. उदाहरणार्थ शिशुपालाचे पुढील उद्गारच पहा (सभापर्व अ. ३७–४१ व ४२):–

"हे पांडवांनो, तुम्ही मूर्ख आहांत. सूक्ष्म धर्म कळण्याची तुम्हांला मुळींच अक्कल नाहीं. आणि हा भीष्म मूळचाच मूर्ख असून आतां तर वार्धक्यामुळें त्याला स्मृतिभ्रंशही झालेला आहे. राजसिंहासनाचा अधिकार नसलेला हा दाशार्ह कृष्ण आमच्या सारख्या राजेलोकांच्या मंडळींत पूजा घेण्यास मुळींच योग्य नाहीं. कायरे जनार्दना, कुत्र्यानें हविर्भागाला तोंड लावावें त्याप्रमाणें तूं तरी या पूजेचा स्वीकार कसा केलास? षंढाचा विवाह, आंधळ्याचा पाहाण्याचा प्रयोग, त्याचप्रमाणें राजा नसलेल्या तुझी राजाप्रमाणें पूजा सर्वस्वीं अयोग्य आहे. हे भीष्मा, तुझ्यासारख्या षंढानें जें करावयास पाहिजे तेंच तूं केलें आहेस. ज्यांचा कुलपुरुष तुझ्या-सारखा षंढ अथवा तृतीयप्रकृति आहे त्यांच्या हातून दुसरें व्हावयाचें काय? स्वतःच्या ब्रह्मचर्याचा टेंभा पाजळून धर्मनिष्ठेचें तूं जें सोंग आणलें आहेस त्याचें रहस्य आम्ही जाणत नाहीं असें तुला वाटतें काय? एक तर मूर्खपणामुळें किंवा खरें सांगावयाचें म्हणजे क्लीब असल्यामुळें तूं हें ब्रह्मचर्याचें सोंग आणलें आहेस. हे भीष्मा, तुझ्यासारखा तृतीयप्रकृति थेरडा हा ज्यांचा मार्गदर्शक आहे त्यांच्या-कडून याहून वेगळ्या वर्तनाची कोणीही अपेक्षा करीत नाहीं."

शिशुपालाचे हे एकेक उद्गार एवढे भीषण आहेत कीं त्यांचा तो पाऊस पाडीत असतां कंस, नरक, इत्यादि मोठमोठ्या दुष्ट सत्ताधारी लोकांना क्षणार्धांत यमसदनास पाठविणारे श्रीकृष्ण, स्वतःचाच नव्हे तर भीष्मासारख्या सत्कारार्ह व वंद्य लोकांचाही शांतपणें अपमान सहन करीत आहेत हा देखावाच मोठा विलक्षण आहे! त्याविषयींचें आश्चर्य त्या सभेंत बसलेल्या ज्ञानसंपन्न लोकांनाही वाटत होतें असें दिसतें. येवढेंच करून शिशुपाल थांबला नाहीं तर याहूनही तो अधिक बोलत होता. शिशुपाल व त्याचे साथीदार हा सगळा गालिप्रदानास्त्राचा मारा करीत असतां श्रीकृष्णांची ती अपूर्व शांतता पाहून भीष्म शेवटीं म्हणाले (सभापर्व अ. ४०–६ ते ९):—

"हे युधिष्ठिरा, शिशुपालाच्या उग्ररूपावरून तुझें, यज्ञाचें वा श्रीकृष्णांचें कांहीं बिघडणार आहे अशी कल्पना करून घेऊं नकोस.

यानें श्रीकृष्णांना मारण्याची इच्छा करणें म्हणजे कुत्र्यानें सिंहाच्या वधाची इच्छा करण्यासारखें आहे. मी सांगितल्या पद्धतीनेंच वागणें तुम्हांला सर्वस्वीं योग्य आहे. सिंह झोंपला असतां कुत्र्यांनीं संघशः त्याच्या भोंवतीं फेर धरून रागानें भुंकावें तसेंच हा वृष्णीसिंह श्रीकृष्ण अत्यंत शांत आहे असें पाहून हे सगळे कुत्रे भुंकत आहेत. या राजांचा पुढारी शिशुपाल स्वतः सिंह असल्याचा आव आणीत आहे. पण कृष्णरूपी सिंह जोंपर्यंत आपलें स्वरूप प्रकट करीत नाहीं तोंपर्यंतच याच्या गर्जना चालणार." भीमसेन संतापला. श्रीकृष्ण इतके शांत कसे राहतात हें त्याच्या ध्यानांतच येईना. शेवटीं भीष्मांनींच श्रीकृष्णानें शांतपणा सोडावा यासाठीं शिशुपालानें नुसत्या शिव्या देण्याऐवजीं प्रत्यक्ष युद्धार्थ आव्हान करावें म्हणून शिशुपालालाच उद्देशून असें म्हटलें ( सभापर्व अ. ४४ ४१ व ४२ ) कीं :—

"उगाच वटवट करण्यांत काय अर्थ आहे? आम्ही ज्याचें पूजन केलें तो हा श्रीकृष्ण येथें बसला आहे. ज्या कोणास लवकर मरण हवें असेल त्यानें चक्र व गदा धारण करणाऱ्या ह्या श्रीकृष्णाला युद्धासाठीं आव्हान करावें व या यादवश्रेष्ठ देवाच्या शरीरांतच मरून प्रवेश करावा." तरीही श्रीकृष्ण कांहीं बोलले नाहींत. पण भीष्मांची ही मात्रा योग्य ठिकाणीं लागू पडली. शिशुपालानें या नंतर युद्धासाठीं श्रीकृष्णांना आव्हान दिलें. महाभारतकार (सभापर्व अध्याय ४५) म्हणतात :

"भीष्मांचें हें वाक्य ऐकतांच श्रीकृष्णांशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें शिशुपाल त्यांना सर्वांसमक्ष हांक मारून म्हणाला, हे जनार्दना, मी तुला युद्धासाठीं आव्हान करतों. असेल सामर्थ्य तर तें आव्हान स्वीकार. ह्या सर्व पांडवांसहित आज मी तुला ठार मारतों. राजा नसतांना तुझी पूजा करणारे हे पांडव व त्यांची पूजा स्वीकारणारा तूं हे दोघेही माझ्या दृष्टीनें वध्य आहांत. वस्तुतः नात्यामुळें पांडवांच्यावर मी शस्त्र उचलूं नये. पण तुझ्यासारख्या जन्मजात दासाची जे आमचा अतिक्रम करून पूजा करतात ते निःसंशय वध्य आहेत." या प्रमाणें आव्हान देऊन तो जोरजोरानें

गर्जना करूं लागला. पण जो आपल्या दृष्टीनें वध्य तो प्रथम जगाच्याही दृष्टीनें वध्य ठरण्याची आवश्यकता आहे या नीतीचे महान् पुरस्कर्ते असलेले भगवान् श्रीकृष्ण त्याच्याशीं न बोलतां सर्व राजांना हांक मारून अत्यंत मृदु स्वरांत बोलूं लागले. त्यांनीं शिशुपालाचे एकामागून एक घोर अपराध सर्वांच्या निदर्शनास आणून दिले व आपलें सुदर्शन चक्र हातांत घेऊन ते उभे राहिले. आतां मात्र आपला क्रोध व्यक्त करण्याची वेळ आली हें ध्यानांत घेऊन आवाजांतील मृदुपणा काढून टाकून त्यांनीं गर्जना केली व ते राजे लोकांना उद्देशून म्हणाले : याच्याच आईच्या प्रार्थनेवरून याचे शंभर अपराध मी पोटांत घातले. तिनें जें मागितलें तें मी तिला दिलें. हा कोणत्या पद्धतीनें बोलतो व किती भयानक कृत्यें करतो हें तुम्हीं पाहिलेलें आहे. मी तें सर्व वचनाच्या मर्यादेचें परिपूर्ण पालन करण्यासाठीं अक्षरही न बोलतां सहन केलें. आतां याचे शंभर अपराध भरले आहेत. यानें मला आव्हानही दिलें आहे. आतां हा एकशेंएकावा अपराध मी मुळींच सहन करणार नाहीं. तुम्हां सगळ्यांच्या समक्ष मी आतां ह्याला ठार मारतों.'' याप्रमाणें बोलून क्षणार्धांत श्रीकृष्णांनीं आपल्या सुदर्शन चक्रानें शिशुपालाचा शिरच्छेद केला. क्रोधासारखी विलक्षण भावना, पण ती श्रीकृष्णांनीं आपल्या इच्छेनुरूप खेळविलेली आहे. त्या भावनेमुळें ते स्वतः तिच्या हातांतील यंत्र बनले नाहींत. आवश्यक तो मनोविकार आपल्या इच्छेनुरूप वापरणें व नाहीं त्या वेळीं तो अजिबात विस्मरणाच्या कोशांत टाकून देणें याला केवढी अपूर्व धारणाशक्ति लागत असेल! भयानक प्रसंगांत देखील रागवावयाचें नाहींच असें जर श्रीकृष्णांनीं ठरविलें तर ती गोष्ट त्यांना कशी सहजसाध्य असे व कोणीही कोणत्याही कारणास्तव त्यांची इच्छा नसतांना एखादा मनोविकार त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न करावयास कसा असमर्थ ठरत असे याचें त्यांनीं स्वतःच सांगितलेलें अेक उदाहरण येथें देतों.

त्यांचा मुलगा प्रद्युम्न तपस्वी लोक आमचा अपमान करतात म्हणून तो आम्हीं काय म्हणून सहन करावा व कसा सहन करावा असें श्रीकृष्णांनाच विचारूं लागला. त्यावर त्याला स्वतःच्या सहन-

शीलतेची एक अपूर्व गोष्ट भगवान् श्रीकृष्णांनीं सांगितली. ( अनुशासनपर्व अध्याय १५९–१४ ते ४९ ) ते म्हणाले:

"हे प्रद्युम्ना, माझ्या घरीं एक मोठा क्रोधी ऋषि रहात असे. सदैव क्रोधानें तो तांबडालाल असावयाचा. वल्कलें नेसलेला, हातांत बेलाच्या झाडाचा दंड घेतलेला, दाढीमिशा वाढलेला, अत्यंत कृश, व प्रमाणाबाहेर उंच असा तो असून त्रिभुवनांत त्याचा अनिरुद्ध संचार असे. एकदां तो द्वारकेंत आला व रस्ते आणि लोकांचे जमण्याचे अड्डे पाहून अशी गर्जना करीत हिंडू लागला कीं 'या द्वारकेंत सत्कारपूर्वक मला आपल्या घरीं ठेवण्याची सिद्धता असलेला एकादा मनुष्य आहे काय? मी अत्यंत शीघ्रकोपी आहे. माझें नांव दुर्वास. अत्यंत सूक्ष्म जरी अपराध झाला तरी तो मला सहन होणार नाहीं. निखाऱ्याप्रमाणें माझा स्वभाव रागीट आहे. ज्या कोणाला मला आपल्या घरीं ठेवून घ्यावयाचें असेल त्यानें मला मुळींच राग आणतां कामा नये. आहे कोणाची सिद्धता? कोणीही त्याला द्वारकेंत आपल्या घरीं ठेवून घ्यावयास धजेना. मी त्याची ती घोषणा ऐकली व त्याला स्वतःच्या महालांत आणलें. त्यानें मला राग आणण्याचे आत्यंतिक प्रयत्न केले. एखाद्या वेळीं त्यानें सहस्रावधि लोकांचें अन्न खाऊन फस्त करावें, म्हणून त्याला भूक लागल्यास तेवढें अन्न पुन्हां तयार करावें तो त्यानें अगदींच दोन घांस खाऊन अज्ञात स्थळीं निघून जावें, व पुन्हां तोंडही दाखवूं नये. उगाचच हंसावें, मध्येंच जोरजोरानें रडावें, एकदां तर त्यानें आपल्या राहण्याच्या ठिकाणालाच आग लावून दिली! त्या आगींत शय्या, आस्तरणें, इतकेंच नव्हे तर अलंकृत कन्या सुद्धां दग्ध झाल्या. त्याला वाटलें मी रागावेन. पण मी अक्षरही बोललों नाहीं. शेंवटीं मी रागावत नाहीं असें पाहून त्यानें आत्यंतिक प्रयोग केला. तो मला म्हणाला, कृष्णा, मला अतिशय भूक लागली आहे. अटीव दूध हवें. त्याचें अंतःकरण ओळखून मी विविध प्रकारचा स्वयंपाक सिद्ध केला व त्याला उकळतें अटीव दूध दिलें. त्यानें तें दूध प्राशन केलें व मला असें सांगितलें कीं हें उरलेलें दूध तूं आपल्या सर्वांगाला लावून घे. मी त्याच्या आज्ञेप्रमाणें खरोखरींच माझ्या सर्वांगाला

तें उच्छिष्ट दूध लाविलें त्यानें तुझ्या आईलाही (रुक्मिणीस) तें दूध लावावयास सांगितलें. अटीव दुधानें अंग माखलेल्या आम्हां दोघांनाही रथाला जुंपून अग्नीप्रमाणें तेजस्वी असा तो तपस्वी हातांत चाबूक घेऊन रथावर बसला. तो माझी परीक्षाच पहात होता. अगदीं राजमार्गावरून त्यानें आमची त्या अवस्थेंतील मिरवणूक काढली. मधून मधून तर तो हातांतील चाबकानें रुक्मिणीला ढोंसावयाचा व फटकारेही द्यावयाचा. रस्तोरस्तीं लोकांची गर्दी जमली. माझा हा विचित्र अपमान पाहून द्वारकेंतील सारे यादव संतापले. पण माझ्या इच्छेनेंच मी तें पत्करलें असल्यामुळें कोणाला कांहीं हस्तक्षेप करतां येईना. ते म्हणूं लागले : असा रथ सिद्ध करून कोणी जिवंत सुटूं शकेल काय? पण त्यांच्या स्वतःच्याच इच्छेला कोणी काय करावें ? रुक्मिणीला ते कष्ट सहन झाले नाहींत. ती अडखळून खालीं पडली. पण त्या क्रोधन तपस्व्याला ती गोष्ट सहन झाली नाहीं. त्यानें तिला चाबकानें फटकारलें. तरीही ती लवकर उठूं शकत नाहीं असें पाहून त्यानें रथावरून खालीं उडी घेतली व तो पळून जाऊं लागला. दक्षिणेकडे तोंड करून तो धांवत असतां मी तसाच 'अपराधाची क्षमा करा, प्रसन्न व्हा' अशी प्रार्थना करीत त्याच्यामागें धांवलों. शेवटीं तोच विरघळला. माझ्याकडे तो वळला व गहिंवरून मला म्हणाला : श्रीकृष्णा, निसर्गतःच तूं क्रोध जिंकलेला आहेस. विकार तुझ्यावर आपली सत्ता चालवूं शकत नाहींत. अणुमात्र तुझा अपराध नाहीं. मी तुझ्यावर अत्यंत प्रसन्न झालों आहें. तुला मी वरदान देतों. मनुष्याचें सर्वांत अधिक प्रेम अन्नावर असतें. जितके लोक आपल्या उपजीवनावर प्रेम करतील तितकें उत्कट प्रेम ते तुझ्यावर करतील असा माझा तुला आशीर्वाद आहे. तुझें पुण्य फार मोठें आहे. लोक तुझ्यावर अपूर्व प्रेम करतील. तुझी कीर्ति दिक्कोन गर्जवीत शाश्वत स्थिरावेल. जें जें कांहीं माझ्याकडून तुझ्या घरीं भग्न वा भस्म झालें असेल तें तें सर्व जसेंच्या तसें तुला मिळेल. तुझ्या ज्या अंगाला तूं दूध लावलें आहेस तेथें तुला मुळींच मृत्यूचें भय राहणार नाहीं. इच्छा असेल तोंवर तूं जगांत राहाशील. तूं आपल्या पायांच्या तळव्याला दूध लावलें

नाहींस हें मात्र बरें केलें नाहींस." तो माझ्याशीं हें बोलत असतां मी माझ्या स्वतःच्या शरीराकडे पाहिलें तों तें अपूर्व कांतीनें लकाकत होतें. तो तपस्वी रुक्मिणीकडे वळला व तिला म्हणाला, सर्व स्त्रियांत तूं श्रेष्ठ होशील. तुझी कीर्ति दिगंत पसरेल. जरा, रोग, व अंगकांति कमी होणें तुझ्या संबंधांत कधींही घडून येणार नाहीं. तुझा गंध अत्यंत उत्कृष्ट राहील. अपूर्व पतिप्रेम तूं संपादन करशील. कृष्णाच्या हृदयांत तुझें स्थान अखंड राहील." याप्रमाणें बोलून अग्नीसारखा तेजस्वी तो दुर्वास सर्वस्वीं प्रसन्न होऊन निघून गेला."

म्हणूनच भीष्मांनीं श्रीकृष्णासंबंधीं सभापर्वांत उद्‌गार काढतांना क्षत्रियांत श्रीकृष्ण श्रेष्ठ आहेतच, पण ब्राह्मणांतही श्रीकृष्ण सर्वश्रेष्ठ आहेत असे उद्‌गार काढले आहेत. विकारांवरील त्यांच्या या अपूर्व अधिसत्तेशीं तुलना करणारें दुसरें कोणाचेंही उदाहरण देतां येईल काय?

काम व क्रोध यांच्या विजयाचीं उदाहरणें श्रीकृष्णांच्या जीवनांत लहानपणापासूनच आहेत. मथुरेचें राज्य वस्तुतः त्यांचें स्वतःचें असतांना त्यांनीं कोणत्या उदात्त धारणेनें उग्रसेनाशीं बोलून तें नाकारलें याचा उल्लेख मी मागें केलाच आहे. त्यानंतर जरासंधाला ठार मारून युधिष्ठिराचा राजसूय यज्ञ करविण्याची ज्या वेळीं वेळ आली त्या वेळीं जगताचें साम्राज्य केवळ श्रीकृष्णानेंच मिळविलेलें आहे, त्यामुळें राजसूययज्ञ करणें हा त्यांचा हक्क आहे याची पूर्णपणें जाणीव असल्यामुळें युधिष्ठिरांनीं त्यांना असें सांगितलें कीं, ( सभापर्व अध्याय ३३–१८ ते २१ ):—

"हे श्रीकृष्णा, केवळ तुझ्यामुळें पृथ्वीचें राज्य मला मिळालें आहे. एवढी मोठी संपत्तीही मला मिळणें हें केवळ तुझ्या कृपाप्रसादाचेंच फळ आहे. माझी अशी इच्छा आहे कीं, विधिपूर्वक हें सर्व यज्ञ आणि ब्राह्मण यांच्या सेवेसाठीं लावावें. तुझ्यासहित व बंधूसहित हें पुण्यकर्म पार पडावें अशी माझी इच्छा आहे. म्हणून हे गोविंदा, तूं स्वतः यज्ञदीक्षा घे. तूं यज्ञ केलास म्हणजे मी कृतार्थ झालों." पर्यायानें साम्राज्य व राजसूय दोन्हींचें नेतृत्व व कर्तृत्व युधिष्ठिर श्रीकृष्णांकडे सोपवीत होते व त्यावर त्यांचा अधिकारही

होता. पण भगवंतांच्या या कृतीचें उद्दिष्टच वेगळें असल्यामुळें त्यांनीं युधिष्ठिरांना उलट असें उत्तर दिलें ( सभापर्व अध्याय ३३–२३ ) कीं,

"हे राजश्रेष्ठा, तूंच या जगाचें साम्राज्य भूषविलें पाहिजेस व सम्राटाला योग्य असा हा यज्ञही तूंच केला पाहिजेस. तूं हें केलेंस म्हणजे मी कृतार्थ होईन. मी तुझ्या कल्याणासाठीं येथें उभा आहे. या यज्ञांत तुझ्या इच्छेस येईल तें काम तूं मला सांग. तुझ्या आज्ञेचें माझ्याकडून अवश्य पालन होईल." त्यांची निर्लोभता इतकी विलक्षण होती कीं, कर्तृत्व स्वतःचें, पण श्रेय नि कीर्ति मात्र इतरांच्या पदरांत ते कशी घालीत याचें वर्णन मी जयद्रथ–प्रकरणांतील त्यांनीं केलेल्या अर्जुनाच्या प्रशंसेच्या रूपानें मागें केलेंच आहे. जी कोणालाही अशक्य अशी अंतःकरणाची ही विशिष्ट धारणा श्रीकृष्णांच्या ठिकाणीं कां स्वभावसिद्ध होऊन राहिली होती याचें विश्लेषण त्यांच्या पूर्णावताराचें वर्णन करतांना आपण पुढें करूं.

निर्लोभतेमागोमागच अलौकिक मानापमानातीततेचीही त्यांची धारणा मनाला स्तिमित केल्यावांचून राहात नाहीं. व्यक्तित्वाचा कोणताही भाव न उरल्यामुळें ती वृत्ति त्यांच्या अंगीं सहज बाणलेली आहे. पांडवांशीं संबंध प्रस्थापित करावयाचा असें ठरल्यावर स्वतः होऊन चालत ते युधिष्ठिराकडे गेले याचा उल्लेख मी मागें केलाच आहे. राजसूय यज्ञांत कोणी कोणतें काम घ्यावें असा प्रश्न उपस्थित झाल्याबरोबर सर्वांच्या आधीं अग्रपूजा घेण्याचा ज्यांचा अधिकार त्या श्रीकृष्णांनीं कोणतें काम घेतलें असेल? महाभारतकार ( सभापर्व अध्याय ३५–१० ) म्हणतात :–

"सर्व लोकांनीं वेष्टिलेल्या श्रीकृष्णांनीं उत्तम फल पदरांत पडावें म्हणून स्वतः ब्राह्मणांचे पाय धुण्याचें काम पत्करलें." श्रीकृष्णांसारखा सर्व दृष्टींनीं सर्वश्रेष्ठ असलेला पुरुषोत्तम हें काम पत्करावयास पुढें येतांच इतर कोणालाही अमकें काम करावें कीं तमकें करूं नयें असें वाटण्याचा प्रश्नही उत्पन्न झाला नाहीं. किंबहुना त्यांतून कोणाच्या अंतःकरणांत असा अहंकारविशिष्ट विचार आला

असला तरी तो प्रकट करण्याचें त्यास धैर्य उरलें नाहीं. लोकांना वळण लावावयाचें असलें तर स्वतःच हवें तें करण्याची अंतःकरणाची सिद्धता लागते. हेंही नेतृत्वाचें एक महान् तत्त्व श्रीकृष्णांनीं आपल्या या आचरणांत प्रकट केलें आहे.

महायुद्धाच्या प्रसंगीं अर्जुनाचें सारथ्य करीत असतांनाही त्यांची हीच वृत्ति प्रकट झालेली आहे.

## श्रीकृष्णांचें दैवी सामर्थ्य

श्रीकृष्णांच्या गुणविशेषांचें व सामर्थ्याचेंही मानुष आणि दैवी असें द्विविध दर्शन महाभारतकारांनीं घडविलेलें आहे. महाभारतांतील भीष्म व अर्जुन हे दैवी संपत्तीचे व सामर्थ्याचे जणु सांठेच आहेत. त्यांपैकीं अर्जुनानें तर देवतांना प्रसन्न करून घेऊन महान् अस्त्रें संपादन केलीं. आपल्या सामर्थ्यानें त्रिपुरांतक महारुद्राला त्यानें प्रसन्न करून घेतलें व निवातकवच, पौलोम, कालखंज इत्यादि दैत्यांचा वध केला. खांडववनप्रसंगांत देवगणांनाही त्यानें पराजित केलें असें वर्णन आहे. दैवी सामर्थ्याच्या दृष्टीनें भगवान् श्रीकृष्ण हे अर्जुनापेक्षां अनंतपटींनीं श्रेष्ठ आहेत. संजय तर धृतराष्ट्राजवळ आपला अभिप्राय व्यक्त करतांना असें म्हणतो कीं, "जगत् व जनार्दन यांच्यांत विरोधाचा प्रश्न उत्पन्न झाला तर जनार्दन जगताला भस्मसात् करील पण जगत् कांहीं जनार्दनाला भस्मसात् करूं शकणार नाहीं." श्रीकृष्ण हे जगताचें आदितत्त्व जें सनातन परब्रह्म त्याचा पूर्णावतार म्हणून ओळखले गेले आहेत. अर्थातच त्यांचें दैवी सामर्थ्य तदनुरूपच असणार हें उघड आहे. त्या सामर्थ्याचें महाभारतांत अनेक प्रसंगीं वर्णन आलेलें आहे. तीनदां भगवान् श्रीकृष्णांनीं विश्वरूपदर्शन दाखविलेलें आहे. किंबहुना त्यांच्या संबंधांत ती एक अतिसामान्य गोष्ट असून मनांत आणतांच ते आपला तो भाव प्रकट करूं शकतात. पहिलें विश्वरूपदर्शन त्यांनीं राजा धृतराष्ट्राच्या सभेंत सभासदांना दाखविलेलें आहे. राजा दुर्योधन श्रीकृष्णांना पकडण्याची इच्छा करीत असतां श्रीकृष्णांनीं त्याला असें सांगितलें कीं, तूं मला एकटा समजतोस

पण ती चूक आहे. मी जाईन तेथें विश्वरूप असल्यामुळें मी कधींच एकटा नसतो.' महाभारतकार उद्योगपर्वांत (अ. १३१–४ ते २१) असें म्हणतात :—

"याप्रमाणें बोलून श्रीकृष्णांनीं जोरानें अट्टहास केला, तोंच त्यांच्या शरीरांतून अग्नीप्रमाणें लखलखीत असे अंगुष्ठमात्र तेजोरूप देव बाहेर पडले. त्यांच्या ललाटीं ब्रह्मदेव, वक्षःस्थलीं रुद्र, भुजांचे ठिकाणीं लोकपाल, मुखस्थानीं अग्नि, आदित्य, वसु, अश्विनीकुमार, इंद्रासहित मरुद्गण, यक्ष, गंधर्व, राक्षस इत्यादि सर्व देव व महान् शक्ति दिसूं लागल्या. उजव्या हातांतून अर्जुन व डाव्या हातांतून सायुध बलराम बाहेर पडले. भीम, युधिष्ठिर, नकुल, सहदेव हे पृष्ठ भागांतून व प्रद्युम्नप्रमुख यादव आपआपलीं आयुधें उभारून समोरून बाहेर पडले. शंख, चक्र, गदा, शक्ति, शार्ङ्ग, लांगल, नंदक, इत्यादि सर्व आयुधें श्रीकृष्णांच्या अनंत हातांत विलसूं लागलीं. नेत्र, कान, नाक व तोंड इतकेंच नव्हे तर त्यांच्या प्रत्येक रोमरंध्रांतून भयानक स्वरूपाच्या व सूर्यकिरणांप्रमाणें तेजस्वी अशा ज्वाळा बाहेर पडूं लागल्या. तें भयानक रूप पाहतांच थरकापलेल्या राजांनीं आपले नेत्र मिटले. द्रोण, भीष्म, विदुर, संजय व इतर तपोधन ऋषि हे फक्त श्रीकृष्णांना पूर्णपणें पाहूं शकले. कारण कीं, त्यांना भगवंतांनीं दिव्यचक्षू दिले होते. श्रीकृष्णांनीं निर्माण केलेलें तें आश्चर्य पाहून देवांनीं दुंदुभि वाजविल्या व आकाशांतून त्यांच्यावर पुष्पवृष्टि झाली. ती गडबड ऐकून व विश्वरूप दर्शनाचा तो अपूर्व सोहळा ध्यानांत घेऊन राजा धृतराष्ट्र श्रीकृष्णांना असें म्हणाला कीं, हे पुंडरीकाक्षा, तूंच सर्व जगाचा खरा हितकर्ता आहेस. म्हणून तू माझ्यावर हें विश्वरूप दाखविण्याची कृपा कर. मला नेत्र दे. एकदां त्या नेत्रांनीं मी तुझें रूप पाहिलें कीं, पुन्हां ते आवरून घे. कारण एकदां तुला पाहिल्यावर दुसऱ्या कोणालाही पुनश्च पहाणाची माझी इच्छा नाहीं.' धृतराष्ट्राचें तें बोलणें ऐकल्यावर श्रीकृष्णांनीं 'तथास्तु' म्हटलें व त्याला दोन नेत्र उत्पन्न झाले. तें अद्भुत आश्चर्य पाहून सर्वांनीं श्रीकृष्णांची स्तुति केली."

विश्वरूप दर्शनाचा असाच दुसरा महत्त्वाचा प्रसंग श्रीमत् भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायांत आहे. अर्जुनाला दहाव्या अध्यायांत विभूतियोग सांगितल्यावर त्याची निश्चिति पटविण्यासाठीं श्रीकृष्णांनीं त्याला विश्वरूपदर्शन दिलें आहे. श्रीकृष्णांच्या गीतेंतील या विश्वरूपदर्शनाचें प्रकरण इतकें प्रसिद्ध आहे कीं, त्याचा नुसता उल्लेख केला तरी पुरें आहे. तिसऱ्यांदा श्रीकृष्णांनीं विश्वरूप दाखविल्याचें वर्णन महाभारताच्या आश्वमेधिक पर्वांत आहे. युद्ध संपवून व युधिष्ठिराला राज्याभिषेक करून श्रीकृष्ण द्वारकेंत परत जात असतां त्यांना उत्तंक नांवाचा एक तेजस्वी ऋषि भेटला व कुरुपांडवांत संधि न केल्याबद्दल तो त्यांना दोष देऊं लागला. श्रीकृष्णांनीं त्याला स्वतःच्या दिव्यजन्मकर्माचें रहस्य समाजावून सांगून त्याच्या अपसमजाचें निराकरण केलें. त्या वेळीं तो त्यांना असें प्रार्थूं लागला कीं, तुमच्या परमेश्वरी स्वरूपाचें मला साक्षात् दर्शन हवें आहे. भगवंतांनीं त्याची ती इच्छा पूर्ण केली. महाभारतकार आश्वमेधिक पर्वांत (अध्याय ५५–४ ते ६) म्हणतातः–

"नंतर प्रसन्न झालेल्या श्रीकृष्णांनीं अर्जुनाला जें दाखविलें होतें तेंच शाश्वत वैष्णव स्वरूप त्यालाही दाखविलें. विश्वरूप–महाभुज सहस्रसूर्य वा अग्नीप्रमाणें तेजस्वी, सर्वतोमुख व सर्व अवकाश व्यापून टाकणाऱ्या त्या परमेश्वरी स्वरूपाला पाहून त्याला मोठा विस्मय वाटला." भगवंतांच्या या महान् विश्वरूपदर्शनाचा काय उलगडा असूं शकेल तें आपण पुढें एका स्वतंत्र व्याख्यानांत पहाणारच आहोंत. तेथें फक्त भारतांतील दैवी सामर्थ्यशाली व्यक्ति श्रीकृष्णांच्या पायाशीं नम्र होण्याइतका दैवीभाव त्यांच्या ठिकाणीं कसा सहजसिद्ध होता एवढें सांगण्यापुरतेच हे तीन प्रसंग उल्लेखिले आहेत.

श्रीकृष्णांच्या या विभूतिमत्त्वामुळें अनेक महत्त्वाच्या प्रसंगीं महान् शक्तींचा त्यांच्याकडून आविष्कार झालेला आहे. कुरुपांडवांचें द्यूत होऊन द्रौपदीला पणाला लावल्यावर दासी म्हणून दुःशासनानें तिला भरसभेंत खेंचीत आणलें व त्यानंतर दुर्योधनाच्या आज्ञेवरून तिच्यावर वस्त्रहरणाचा भयानक प्रसंग कौरवांनीं आणला. ज्या

